# व्युत्पत्ति.

(१) **उतार वयः**— याचा अर्थ म्हातारपण असा आहे. संस्कृत "उत्तरं वयः' यापासून मराठींत 'उतार वय' हा शब्द आला आहे.

(२) **कोथिंबीरः**— मूळ संस्कृत शब्द 'कुस्तुंबरु' असा असून त्यापासून कोथिंबीर हा शब्द बनला आहे.

(३) **खळमळ**:— मूळ संस्कृत शब्द 'कलिमल' यापासून 'खळमळ' शब्द निघाला आहे. (भूयात् भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ।)

(४) **जंगलः**— हा तत्सम शब्द आहे. मूळ अर्थ एकांतस्थान, हल्ली निबिड अरण्य. (जंगलं निर्जने स्थाने । मेदिनी)

(५) **झेंगटः**— पिरपिर, सारखा कोणत्या तरी गोष्टीचा छंद. मूळ संस्कृत शब्द 'जेंगटः' त्याचें रूपांतर 'झेंगट'. जेंगट याचा अर्थ डोहाळे (गर्भवती स्त्रीचे). जेंगटो दोहदः स्मृतः । हारावली. गर्भवती स्त्रीस नित्य नव्या वस्तूची इच्छा होत असते. एका इच्छेची पूर्तता झाली की, पुन्हा दुसऱ्या वस्तूची इच्छा होते. या क्रमावरून वर दिलेले अर्थ झेंगट या शब्दास प्राप्त आहेत.

(६) **धणे-नेः**— मूळ संस्कृत शब्द 'धान्याक' त्याचें प्राकृतद्वारा मराठी रूप धणा-ना.

(७) **नस-साः**— मूळ शब्द स्नसा. (मस्तुलुंगोऽप्यथ स्नसा । त्रिकांडशेष) याचें प्राकृतद्वारा मराठींत रूपांतर नस-सा. (Nerve).

(८) **बिः**— मराठ्यांच्या बोलण्यांत येतो. अपि याचें प्राकृतांत बि हें रूप होतें. रामोऽपि आगतः । = रामा बि आला.

(९) **रिंगरिंग जाणें**:— हळुहळु जाणें. मराठ्यांच्या बोलण्यांत येतो. संस्कृत रिंग्=रिंगति पासून रिंग; रिंग्=हळुहळु जाणें, रांगणें. रांगणें यांतहि रिंग् हाच धातु आहे.

(१०) **लंकाः**— स्वैरिणी स्त्री. हा तत्सम शब्द आहे. लंका रक्षःपुरी शाखा शाकिनी कुलटासु च । मेदिनी. लंका असें वाईट अर्थाने स्त्रियांना म्हणतात.

**प्र. धों. कानिटकर**

**सुबोध**—(वर्ष २ अंक १) संपादक सां. ब. कंटक, मुरगांव, हारबर (गोंवा) वा. व. ३ रु. सुबोध मालेचें या अंकापासून मासिक झालेलें असून प्रस्तुत अंकांत ३ कविता, ३ गोष्टी, १ व्यापारी लेख (शं. वा. किर्लोस्कर) १ स्फुट लेख (दा. न. शिखरे) व १ पुस्तकसमालोचन आलें आहे. निवड चांगली आहे. पण या छोट्या मासिकाने इतर मोठ्या मासिकांचें अनुकरण न करितां केवळ विशिष्ट दिशेने गोमंतकी वाङ्मय निर्मितीचें कार्य करीत राहिल्यास याच्या अस्तित्वाची गरज भासून मोठें देश-भाषा-हितहि साधेल.

# सांकेतिक भाषा

महाराष्ट्रीय संतकवींच्या वाङ्मयांत सांकेतिक भाषेचा उपयोग केल्याचें दिसत नाही. माहानुभाव पंथांतील ग्रंथांत मात्र निरनिराळ्या सांकेतिक भाषा उपयोगांत आणल्या आहेत. कै. वि. का. राजवाडे यांनी कांहीं महानुभावांचे ग्रंथ भा. इ. सं. मंडळाच्या इतिवृत्तांत प्रकाशित केले आहेत व त्यांतील सांकेतिक भाषेची फोडहि त्यांनी केली आहे. तसेंच त्यांनी कांहीं जुनीं बाडें ( वैद्यक ग्रंथ ) सदर इतिवृत्तांत प्रसिद्ध केलीं आहेत तीं सांकेतिक भाषेत लिहिलीं आहेत. श्री. के. अ. पाध्ये यांनी 'हेमाद्रीपंडिता'चें चरित्र प्रसिद्ध केलें आहे त्यांत माहानुभावांच्या ४।५ सांकेतिक भाषांचा उल्लेख केला आहे. चारचौघांत बसलें असतांना एखाद्याला एखाद्या विशिष्ट व्यक्तीस कांही हकिगत कळवावयाचें असल्यास तो सांकेतिक भाषेने तें सांगतो. पांडव लाक्षागृहाकडे निघण्यापूर्वी विदुराने धर्मराजास लाक्षागृहासंबंधीं सर्व माहिती कौरवांसमक्ष बर्बर भाषेंत सांगितली होती असा महाभारतांत उल्लेख आहे. पेशवाईतील कांहीं सांकेतिक भाषेंतील पत्रें भा. इ. सं. मंडळाच्या इतिवृत्तांत व त्रैमासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. येणेंप्रमाणे सांकेतिक भाषा लेखांत समाविष्ट झाल्याचीं उदाहरणें आहेत.

संस्कृत काव्यनाटकांत सांकेतिक भाषा उपयोगांत आणल्याचें आढळत नाही. सांकेतिक भाषेला 'म्लेच्छित' किंवा 'म्लेच्छितक' अशी संज्ञा आहे. म्लेछित शब्दांत 'म्लेच्छ्' हा धातु असोन त्याचा अर्थ 'अस्पष्ट रीतीने किंवा गावंढळ रीतीने बोलणें' असा आहे. (म्लेच्छति, म्लेच्छयति-ते ). म्लेच्छिताचा उल्लेख वात्स्यायनाने ६४ आंतरकलांत केला आहे. (कामसूत्र, साधारणमधिकरणम्—अध्याय ३ पृ. ३३). पंडित दुर्गाप्रसाद यांनी यशोधराच्या टीकेसह कामसूत्र प्रसिद्ध केलें आहे. त्यांत "म्लेच्छित-विकल्पाः" याजवर खालीलप्रमाणे टीका आहे:—

म्लेच्छित विकल्पा इति। यत्साधुशब्दोपनिबद्धमप्यक्षरविन्यासात् अस्पष्टार्थं तन्म्लेच्छितं गूढवस्तुमंत्रार्थम्। तस्य विकल्पाःबहवाः पूर्वाचार्योक्ताः ॥

यावरून ज्यांत शब्द चांगले असतात परंतु अक्षरांची विशिष्ट रचना असल्यामुळे ज्या भाषणाचा अगर शब्दाचा अर्थ स्पष्ट कळत नाही, त्यास म्लेच्छित किंवा सांकेतिक भाषा म्हणतात. या भाषेचे बरेच प्रकार आहेत असें टीकाकार म्हणतो. टीकाकाराने तीन प्रकार सांगितले आहेत ते खालीं देतो.

( १ ) कौटिलीयं यदि क्षान्तैः स्वरयोर्ह्रस्वदीर्घयोः :
बिन्दूष्मणोर्विपर्यासाद्दुर्बोधमिति संज्ञितम् ॥

( २ ) अकौ खगौ घङौ चैव चटौ तपौ यशौ तथा।
एते व्यस्ताः स्थिराः शेषा मूलदेवीयमुच्यते ॥

( ३ ) ग्रहनयनवसुसमेतं षडाननाह्वयानि सागरा मुनयः।
ज्वलनांगं तुकशृंगं दुर्लिखितं गूढलेख्यमिदम् ॥
( कामसूत्र, अध्याय ३ पृ. ३९ )

यापैकी पहिला प्रकार असाः——

प्रत्येक शब्दाच्या शेवटीं 'क्ष' हें अक्षर घालावयाचें, ह्रस्व दीर्घाची बदला-बदल करावयाची व विसर्गाच्या ठिकाणीं अनुस्वार व अनुस्वाराच्या ठिकाणीं विसर्ग घालावयाचा; या प्रकाराला दुर्बोध अशी संज्ञा आहे. या पद्धतीने "रामा आला" हें वाक्य "रमक्ष अलक्ष" असें होईल. या श्लोकांतील "कौटिलीयं" या पदाचा अर्थ वरील विवरणांत आला नाहीं. या सांकेतिक भाषेशीं कौटिल्याचा संबंध 'कौटिलीयं' या शब्दावरून असावा असें वाटतें. "यदिक्षान्तैः" याच्या ऐवजीं "मिताक्षरी" असाहि पाठ आहे. तो घेतला तर "रामा आला" याचें रूपांतर "दरमक्ष दअलक्ष" असें होईल.

दुसरा प्रकारः——

या सांकेतिक भाषेचें नांव 'मूलदेवीय किंवा मूलदेवी' असावें असें वाटतें. "मूलदेवीयमुच्यते" याचीं दोन प्रकारचीं पदें पडतात; [ १ ) मूलदेवी इयम् उच्यते। किंवा ( २ ) मूलदेवीयम् उच्यते। मूलदेव हें कंसाचें एक नांव आहे; कंसाचा या भाषेशीं कांहीं संबंध असल्यास माहीत नाहीं. दुसऱ्या श्लोकाची फोड अशी आहे:——

अ = क; ख = ग, घ = ङ, चवर्ग, टवर्ग = तवर्ग = पवर्ग
य = श ळ, क्ष, ज्ञ हीं तीन अक्षरें तशींच राहतात.
र = ष
ल = स
व = ह

याप्रमाणेच एक सांकेतिक भाषा प्रचारांत ( विशेषतः मुलांमध्ये ) आहे तिला "मिताक्षरी" म्हणतात. मिताक्षरी भाषेचा श्लोक खालीं देतो.

अकौ खगौ घङश्चैव चटौ तपौ परस्परौ।
यशौ रषौ लसौ चैव हवाळाक्ष मिताक्षरी ॥

हा श्लोक शुद्ध नाहीं. परंतु मूलदेवी व मिताक्षरी या एकच भाषा आहेत असें सहजीं दिसतें. वरील दुसऱ्या श्लोकांत "यशौ" हें एकच पद आहे; या श्लोकांत यश, रष, लस हव, ळक्ष अशा जोड्या स्पष्ट दिल्या आहेत. फक्त 'ज्ञ' या अक्षरास प्रति अक्षर दिलेलें नाही. दोन्ही भाषांप्रमाणे, "तिकडे कशाला जातोस" हें वाक्य "पिअजे अयासा डापोल" असें होतें. मूळदेवी ( य ) मध्यें ळ, क्ष, ज्ञ हे तीन वर्ण स्थिर म्हणजे न बदलतां राहतात व मिताक्षरींत फक्त 'ज्ञ' च स्थिर राहतो.

तिसरा प्रकारः——

श्लोकावरून या सांकेतिक भाषेला 'गूढलेख्य' नांव असावें असें

दिसतें. परंतु नांवाप्रमाणे श्लोकाचा अर्थ गूढच आहे. कोणास अर्थ लागल्यास त्यानें अवश्य उलगडा करावा.

कै. राजवाडे व श्री. पाध्ये यांनी महानुभावांच्या सांकेतिक भाषांचे उल्लेख केल्याचें वर म्हटलें आहे. त्या भाषांची फोड (किल्ली) पाहिली असतां त्या सर्वभाषा थोड्या फार फरकाने मूलदेवीच्या तत्वावर बनविल्या आहेत असें दिसतें.

डोळ्यांच्या किंवा हातांच्या खुणांनी आपले मनोगत दुसऱ्यास कळवितां येतें अशा खुणा ज्यांत आहेत त्याला 'नेत्रपल्लवी' व 'करपल्लवी' अशीं नांवें आहेत. यांत शब्द मुळींच नसल्यामुळे या प्रकारास भाषा असें म्हणतां येत नाही. कौटिलीय व मूलदेवी (य) या भाषांचा उपयोग लेखांत व बोलण्यांतहि करतां येईल. अंकावरहि एक भाषा बसविलेली आहे. तिला भाषा म्हणण्यापेक्षां सांकेतिक लिपी हें नांव अन्वर्थक होईल. इजिप्त देशांतील चित्रलिपी प्रसिद्धच आहे आठवड्याचा 'Times of India' किंवा 'Bombay Chronicle' यांत चित्र लिपीचीं कोडीं नेहमी येत असतात. चित्र लिपीचा उपयोग फक्त लेखांतच करणें शक्य आहे.

लहान मुलींचीहि एक सांकेतिक भाषा आहे. तिचे प्रकार विविध आहेत. शब्दाचें पहिलें अक्षर शेवटीं घालून प्रारंभी 'अ' किंवा 'च' घालून मुली बोलतात. या दोन्ही प्रकारांप्रमाणे 'तिकडे कशाला जातोस' हें वाक्य असें होईल.

(१) अकडेति अशालाक अतोसजा.

(२) चकडेति चशालाक चतोसजा.

कांही मुली शब्दांतील प्रत्येक अक्षराच्या पुढे 'पट' हीं अक्षरें प्रत्ययाप्रमाणे लावून बोलतात; या रीतीने वरील वाक्याचें रूपांतर होईल तें :—तिपटकपटडेपट कपटशापटलापट जापटतोपटसपट. हे सर्व प्रकार बालिश आहेत, परंतु बालवर्गांत प्रचलित आहेत म्हणून त्यांचा उल्लेख येथे केला आहे. शिवाय "साहित्यं बालजल्पितं" अशी म. सा. पत्रिकेवर केलेली टीका अन्वर्थक व्हावी म्हणून वरील बालिश भाषेचा मुद्दाम उल्लेख केला आहे. सांकेतिक लिपी अनेक प्रकारच्या आहेत, परंतु हा लेख सांकेतिक भाषांसंबंधी असल्यामुळे यांत त्या बद्दल विवेचन करण्याचें कारण नाही.

सांकेतिक भाषा माहानुभावानी मराठी ग्रंथांत उपयोगांत आणल्या ही गोष्ट खरी आहे. परंतु कामसूत्रांचा टीकाकार यशोधर याचे जे तीन श्लोक वर उद्धृत केले आहेत, तो टीकाकार कोणत्या काळीं होऊन गेला व त्याने वरील तीन श्लोकांत ज्या सांकेतिक भाषा व पद्धती सांगितली आहे, ती पद्धती उपयोगांत आणून त्या प्रमाणे संस्कृताची सांकेतिक भाषा तयार करावयाची किंवा ती पद्धति मराठीस अनुलक्षून आहे या गोष्टीचा उलगडा होणें अवश्यक आहे. सुबन्धु व भवभूति यांच्या पूर्वी वात्स्यायन होऊन गेला यांत शंका नाही; कारण वासवदत्ताकथेंत व मालतिमाधव नाटकांत वात्स्यायनाची कांही सूत्रें उद्धृत केलीं आहेत. तेव्हा वात्स्यायन निदान ७ व्या शतकापूर्वी होऊन गेला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. श्रीमतशंकराचार्यांनी

वात्स्यायन सूत्रांवर एक निबंध लिहिल्याचें शंकर दिग्विजयावरून समजतें. सातव्या शतकापूर्वी रचिलेल्या कामसूत्रांत "म्लेच्छित विकल्पा:" हा शब्द आला आहे. टीकाकाराने म्लेच्छिताचे तीन प्रकार तीन श्लोकांत सांगितले आहेत, परंतु प्रत्येक प्रकारचें एकेक उदाहरण दिलें असतें म्हणजे सर्व शंकांचें निरसन झालें असतें.

प्र. धों. कानिटकर.

---

## म्हणी

जांवई माझा भला आणि लेक बाइलबुद्ध्या झाला.
एक पुती रडे, आणि सातपुती रडे, रात्रीं पाट लावला तीपण रडे.
सात सुडे तरी भागूबाईचे कुले उघडे.
चोराच्या भयानं घेतलें रान, वाटेंत भेटला मुसलमान, त्याने कापले नाक कान.
तोंडाशीं तीळ आणि गांडीशीं बुधला.
कुठे जाशी भोगा तर तुझ्या पाठीशीं उभा.
सवकल्या मुता चला जाऊं कालच्या शेता.
चोर पकडावा वाटेवर आणि शिंदळ पकडावी खाटेवर.
डोंगरांत दुखणं आणि शिंपींत औषध.
करून करून भागली आणि देवपुजेला लागली
बुड्डी घोडी लाल लगाम.
बाई आल्या पणांत आणि बोवा बसले कोनांत.
दिवा दिवठणीं आणि वाइल हांतरुणी.
दादाचें बळ वहिनी जाणें.
दिवस गेला नागव्यांनीं आणि नाहतांना पडदणी.
एकदा खावें पण शहरांत रहावें.
शेळांच्या मुताची मानली चाढ आणि शेळी मुतते कुंपणाच्या आड.
बाहेरच्या देवांना टिळेगोळे आणि घरच्या देवांवर हगती कावळे.
ताकाआधी म्हशींचें भांडण.
सजण तोडूं नये आणि डोळा फोडूं नये.
मांजर गेलें लुटी आणि आणल्या चार मुठी.

चिं. पां. बर्वे

# स्त्रियांच्या म्हणी

( मागील अंकावरून पुढे चालू )

( २७६ ) न्हातीचे बाल अन् खातीचे गाल केव्हाहि दिसणारच.
( २७७ ) कर्माची कहाणी, ऐकायला नाहीं कुणी.
( २७८ ) केरसुणी पाहून जातं, अन् दिवा पाहून येतं.
( २७९ ) आवडीचें झाड पासलें, सदा तोंड वासलें.
( २८० ) लाडकी लळू, घरदार जाळू.
( २८१ ) नाहीं गुणाचं, बोलून घेईल कुणाचं.
( २८२ ) उलथा पसा, पालथा पसा, माकडा तुझा संसार कसा.
( २८३ ) कशांत काय, फाटक्यांत पाय.
( २८४ ) मानानं पान खायचं नाही, अपमानानं देठ खायचा.
( २८५ ) लाडाने वेडं, गुळाने बोबडं.
( २८६ ) आपल्या खाली जळत आहे, अन् दुसऱ्याचे विझवण्यास पळत आहे.
( २८७ ) असा लेक दाणा, तर घरोघर सुना.
( २८८ ) अशी लेक सवाई, तर घरोघर जावई.
( २८९ ) ओवा म्हणतो मी आहे गुणी, पण माझ्यावर पितात पाणी.
( २९० ) आमंत्रण दिलें सगळ्या गांवा, वादळ सुटलें, घरीं जेवा.
( २९१ ) हगल्यापेक्षा निपटणें बरें.
( २९२ ) मागे ना पुढे, कुत्रें घेऊन रडे.
( २९३ ) संगतीच्या लोभे, मेळी दोघे.
( २९४ ) भोळी ग बाई भोळी, लुगड्यावर मागते चोळी, खायला मागते पुरणपोळी.
( २९५ ) आली अखिति, झाली सणाची निचिति.

नीलकंठ शंकर नवरे, सोलापूर

---

# कुडाळी–मराठी–भाषा

लेखकः-रा. ब. वासुदेव अनंत प्रभु, वावडेकर

दक्षिण कोंकणांत पूर्वी कुडाळदेश या नावाने संबोधल्याजाणाऱ्या व आज जो प्रदेश रत्नागिरी जिल्हा, करवीर संस्थान, सावंतवाडी संस्थान, गोवाप्रांत आणि बेळगांव जिल्हा यांत विभागला गेला आहे, त्या प्रदेशांत बोलली जाणाऱ्या भाषेस "कुडाळी" अशी संज्ञा आहे. मराठी, कानडी, गुजराथी पाली, मागधी, वंगीय वगैरे भाषांप्रमाणे स्वतंत्र भाषा नसून, ती मराठी भाषेचीच एक उपभाषा आहे. ह्या उपभाषेची रचना अगदी मराठी सारखीच असून फरक फक्त क्रियापदांचीं रूपें, विभक्ति प्रत्यय, मराठी शब्दांस थोडेसें विकृत रूप देऊन बनलेले शब्द व बोलतांना कित्येक शब्द हेल काढून उच्चारण्याची पद्धति यांत आहे. तथापि ही भाषा तत्प्रांतीं फक्त बोलण्याच्या कामींच उपयोगांत आणली जाते व लेखनाच्या कामीं शुद्ध मराठीचाच उपयोग केला जातो, यावरून कुडाळी भाषेला 'भाषा' या नांवाने संबोधण्यापेक्षा "बोली" हें नांव देणें यथार्थ होईल. मनुष्यमात्राच्या अमूर्त विचारांना व्यक्त स्वरूपांत आणावयाचें झाल्यास जी शब्दयोजना बोलींतून व्यक्त केली जाते, तिला भाषा म्हणतां येईल. या दृष्टीने पाहिल्यास वर सांगितलेल्या बोलीला भाषा हें नांव प्रचारांत राहण्यास हरकत नाही. कुडाळ प्रांताच्या दक्षिणेस गोमांतक असून तेथील भाषेला "गोमंतकी" म्हणतात व "कोंकणी" असेंहि नांव देतात. ही गोमंतकी किंवा कोंकणी भाषा स्वतंत्र आहे असें मानून तिच्यांत अलीकडे जसा वाङ्मय निर्माण करण्याचा प्रयत्न चालू असल्याचें आढळतें तसें कुडाळी भाषेचें स्तोम माजविण्याचा प्रयत्न आजवर कोणी केल्याचें एकहि उदाहरण आढळणार नाही. कुडाळी भाषेत ग्रंथनिर्मिति करण्याइतका तिचा शब्दसंभार नाही. "कुडाळी" हें ह्या भाषेचें नांव मात्र कैक शतकांचें जुनें आहे हें पुढे दिलेल्या माहितीवरून दिसून येईल.

## गोमांतकी किंवा कोंकणी.

ओघानेच आल्यामुळे व शेजारधर्मामुळेहि गोमंतकी भाषेसंबंधी दोन शब्द लिहिणें अप्रस्तुत होणार नाही. गोव्याच्या जनपदांत रूढ असलेली जी भाषा किंवा बोली ती "गोमंतकी." अर्थात् हें नांव प्रादेशिक झालें. "कोंकणी" म्हटल्यास गोव्यालाच कोंकण म्हणतात असें मानावें लागेल. पण तसें म्हणण्यास--गोव्यांत कोण असतील ते असोत, इतरत्र-- कोणी तयार नाहीत. ह्यासंबंधी कै. प्रो राजाराम रामकृष्ण भागवत म्हणतातः-" कोंकणी ही एक बोली आहे. हीस "भाषा" हें भव्य नांव शोभत नाही. गोमंतकाच्यावर कोंकण नाहींसें नाही. दमणच्या खाडीपर्यंत वर कोंकणच आहे, हें उत्तर कोंकण; **गोमंतक हा दक्षिण कोंकणचा एक भाग होय.** ...... गोमंतकी माणसें व बोली यांच्या पलीकडे कोंकणी माणसें व बोली नाहींत, अशी खरी हकीकत नसतांहि, हे जसा काय आपला 'गोमंतकी' शब्द चोरून, त्याच्या ठिकाणीं केवळ स्वतः पुरता "कोंकणी" शब्द प्रयोगांत व प्रचारांत आणतात !!!" (विविधज्ञानविस्तार, पुस्तक ३७, अंक १२ वा.). अर्थात् गोमंतक हा कोंकण जनपदाचा एक लहानसा भाग असल्यामुळे तेथील भाषेला अथवा बोलीला "गोमंतकी" हें जनपदावयवी नांव असणें यथार्थ दिसतें. हें नांव बाजूला सारून भागवत म्हणतात त्या प्रमाणें "स्वतःपुरतें कोंकणी" हें नांव कोणी कोणत्या काळाच्या सुमारास पुढे आणलें, हें समजणें महत्त्वाचें

होईल व तें सांगणें आम्हांस फारसें कठिणहि वाटत नाही; परंतु तें बरेंच विस्तारानें सांगावें लागेल म्हणून आणि प्रकृत निबंधाशीं त्याचा संबंध येत नाही म्हणून वर्ज करतों. पण, गोमंतकी अथवा कोंकणी ही मराठी प्रमाणेंच एक स्वतंत्र भाषा आहे की, मराठीचीच पोट किंवा उपभाषा आहे ह्या प्रश्नाला वरील विवरणांत उत्तर नसल्यामुळे तें थोडक्यांत देणें जरूर आहे. सामान्यतः अशी समजूत असल्याचें दिसतें की, थॉमस ( Thomas ) स्टेफेन्स (Stephens) नांवाच्या ख्रिस्ती मिशनरीनें १६ व्या शतकांत " ख्रिस्तपुराण " नांवाचा एक ग्रंथ लिहिला, तो कोंकणी भाषेंत लिहिला. यासंबंधी वर सांगितलेल्या विस्ताराच्या पुस्तकांत प्रो. भागवत काय लिहितात तें सांगूं " ख्रिस्ती १७ वे शतकांत आज कोंकणी म्हणवणारीं माणसें मराठे समजत होतीं, या सर्वांस मराठी भाषेचा मोठा अभिमान होता, याविषयीं शंका घेणें हें दुराग्रहाच्या देवचाराचा[1] संचार आंगीं होऊं देण्यासारखें भासतें. जेथे पुरावा नसेल तेथे आवडी-नावडीचें स्तोम माजवतां येईल. पण पुरावा प्राचीन व भरपूर असतांहि त्याची कशी तरी उडवाउडवी करीत बसणें, ही वाट आडवाट होय, राजवाट खास नव्हे. इ. स. १६ वे शतकांत फादर थॉमस् स्टेफेन्स यानें जुन्या कराराच्या आधारावर पहिलें पुराण व नव्याच्या आधारावर दुसरें पुराण रचलें; हें पुराण इ. स. १६१६ त पहिल्यानें छापून प्रसिद्ध झालें. फादर स्टेफेन्सनें गोमांतक प्रांतांतल्या साष्टी तालुक्यांत आपलें वय घालवलें. अर्थात् त्याची मराठी भाषा साष्टीकरांस त्याकाळीं समजत होती, तेहि स्वतः तीच भाषा बोलणारे होते. " इतकें सांगून ख्रिस्त पुराण जरी गोव्याच्या तत्कालीन प्रच-लित भाषेंत लिहिलें गेलें तरी ती भाषा मराठीच मानली जात होती हें त्या पुराणांतील एक अवतरण देऊन प्रो. भागवतांनी सिद्ध केलें आहे. तें अवतरण खाली देतों.

> परमशास्त्र जगीं प्रगटावया । बहुत जना फलसिद्धी व्हावया ॥
> भाषा वांदोनि मराठिया । कथा निरोपिली ॥ १२१ ॥
>
> पैलें पुरान

वरील अवतरण देऊन भागवत पुढे लिहितातः-" कवि आपल्या काव्याची भाषा मराठी म्हणतो इतकें तिन्हाइतास पुष्कळ आहे; कोंकण्यांनी किंवा गोमंतक्यांनी ती 'कोंकणी' किंवा 'गोमंतकी" खुशाल ठरवावी व मनात मांडे खावे; मनांतल्या मांड्यांनी जर बिचाऱ्यांचें समाधान होत असलें, तर तिन्हाइतांनी त्या समाधानाच्या आड काय समजून यावें ?" स्टेफेन्सनें मराठी भाषेसंबंधी केलेला गौरवपूर्ण उल्लेख व पुराणांतील कोंकणी भाषेचा नमुना म्हणून एक दोन अवतरणें वाचकांच्या माहितीसाठीं खाली देतों.

> झैसी पुस्पामाझी पुस्प मोगरीं । कीं परिमळामाझी कस्तुरी ॥
> तैसी भास्सा माझी साझिरी । मराठीया ॥

> Vo namo Visvabharita, Deva Bapa Sarva Samaratha
> Parmesuara Satevanta Surga prathamichea rachnara.
> Tu anny tuza yecuchi putu Anny Spiritu Santu
> Tegai Zanna yecuchi Satevantu, Devo Zannava.

वरील अवतरणांचे मराठी लिपींत रूपांतरः-

> वो नमो विश्वभरिता । देवा बापा सर्व समरथा ॥
> परमेसुअरा सतेवन्ता । सर्गा प्रथमीचिआ रचणारा ॥
> तूं आनि तुझा येकचि पुतु । आनि स्पिरीतु संतु ॥
> तिगाई झना येकची सतेवन्तु । देवो झानावा ॥

---

[1] देवाचार, (पु.) म्ह. पिशाचयोनींतील एकजात. ( कुडाळींत हा शब्द प्रचारांत आहे.)

ॐ वरील अवतरणांतील "स्पिरीट" ह्या एका शब्दाशिवाय, सर्व शब्द शुद्ध मराठी (संस्कृत-मिश्रित) भाषेंतील आहेत. कवीने खिस्ती धर्मातील विशिष्ट शब्दांचें ज्ञान बाटविलेल्या लोकांस व्हावें म्हणून, प्रॉफेट्, पॅट्रिआर्क, स्पिरिट अशा नांवाचे कांही इंग्लिश शब्द पुराणांत घेतले आहेत. थॉमस स्टीफेन्स हा जन्मतः इंग्लिशमन असून, कॅथोलिक लोकांच्या धर्मछळाच्या वेळीं तो रोममध्ये पळून आला व तेथून इ. स. १५७९ मध्ये गोव्यांत आला, आणि १६१९ मध्ये गोव्यानजीकच्या साष्टीमध्ये वारला.

वर दिलेल्या माहितीवरून दिसून येईल की, गोमांतकी किंवा कोंकणी म्हटलेली भाषा ही लेखाच्या सुरवातीस नमूद केलेल्या भाषांप्रमाणे, स्वतंत्र भाषा नसून कुडाळीप्रमाणेच मराठीची एक उपभाषा आहे. असो.

कुडाळी भाषा जरी त्या प्रांतीं सुशिक्षित-अशिक्षित अशा सर्व जातींच्या लोकांतून बोलली जाते तरी, ब्राह्मणी घरांतून बोलली जाणाऱ्या भाषेवर शुद्ध मराठीचा संस्कार बराच झालेला असतो. म्हणजे बोलतांना ते लोक शुद्ध मराठी शब्द जास्ती वापरतात, पण कुडाळीचे विशिष्ट विभक्तिप्रत्यय व क्रियापदांचीं रूपें व उच्चारांतील हेल कायम ठेवून वाक्यरचना करीत असतात आणि खासगी किंवा सार्वजनिक पत्रव्यवहार, देण्याघेण्यासंबंधाचे दस्तैवज व रोखे, आयव्ययसंबंधी खासगी लिखाण, किंवा ग्रंथलेखन करतांना तें शुद्ध मराठींतच करीत असतात इतकेंच नव्हे तर, पुराण, कीर्तन, व्याख्यान वगैरे धार्मिक व सामाजिक कामें शुद्ध मराठींतच केलीं जातात. त्यामुळे स्त्रिया व लहान मुलें यांच्या पाठांतील फुगडया, झोपाळ्यावरच्यीं, दळण, कांडण करतांना म्हणावयाचीं वगैरे प्रकारचीं (अलिखित) गाणीं खेरीज करून आजवर एकहि लेख किंवा ग्रंथरचना कुडाळी भाषेंत झालेली नाही.

## कुडाळ देशाची मर्यादा

या देशाच्या राज्यविस्ताराच्या प्राचीन मर्यादा आज निश्चित सांगणें अशक्य आहे. या देशावरील अधिराज सत्तेच्या उत्कर्षापकर्षामुळे त्याच्या मर्यादांत वेळोवेळीं फेरफार झाले आहेत. कालांतराने मर्यादांत संकोच झाल्यावर, राहिलेल्या प्रदेशाला पुढे "कुडाळ-पंचमहाल" हें नांव प्राप्त झालें. बदामी (विजापूर जिल्हा) येथील पूर्वकालीन चालुक्य राजांचे कांही ताम्रपट, कुडाळ शहराच्या नजीक असलेल्या नेरूर नांवाच्या गांवीं सांपडले आहेत. त्यांचा काल इ. ७ व ८ शतकांतला येतो. त्यांत कुडाळ देशांत मोडणारे कांही गांव ब्राह्मणांस दान दिल्याची माहिती आहे. परंतु त्यांत देशवाचक नांवाचा किंवा राजधानीचें स्थळ म्हणूनहि "कुडाळ"चा उल्लेख केलेला नाही. इ. स. च्या १२ व्या शतकांत या देशाची उत्तरसीमा दाभोळ बंदरापर्यंत होती; असें "लोकहितवादी" (गोपाळराव हरि देशमुख) व मेजर जर्विस यांच्या लेखांवरून समजतें. १३ व्या शतकांत याची दक्षिण मर्यादा (अर्थात् राज्यविस्तार) गोवा प्रांताचा बराच भाग धरून, त्याच्याहि खालील कारवार, अंकोला व मिर्जनपर्यंत होती; ती पुढे १५ व १६ व्या शतकांच्या अखेरपर्यंत होती, आणि पूर्वेकडे कोल्हापूर संस्थान बेळगाव जिल्हा यांत आज मोडणारा कांही भाग (दक्षिणोत्तर सह्याद्रीवरील पट्टी) समाविष्ट झाला होता. पश्चिमेला लांबच लांब समुद्रपट्टीचा किनारा. या देशाचें राजधानीचें शहर जें "कुडाळ" त्याचा उल्लेख शके ११८५ (इ. स. १२६३) च्या ताम्रपत्रलिखित दानपत्रांत प्रथमच पहावयास मिळतो. त्यांत कुडाळ प्रांतांतील "दिघवलें" गांव तत्कालीन महाराजाने तेथील स्वयंभु महादेवाच्या देवस्थानाला दान दिल्याची माहिती सांगतांना राजधानीच्या शहराचा व महाराजाच्या नांवाचा उल्लेख पुढे दिल्याप्रमाणे केला आहे. '**श्रीदेमभूपाल** विजयराज्यो दै **कुडुवलपत्तने** सुखसंकथाविनोदेन अनवरत राज्यं कुर्वाणः' 'अनवरत राज्यंकुर्वाणः" ह्या वर्णनावरून (पत्तन म्हणजे राजधानीचें शहर) त्याचें एकसारखें बऱ्याच पिढ्या चालत आलेलें राज्य होतें व त्याची राजधानी कुडाळ शहर होतें असें ठरतें. त्यावरून निदान ह्या काळाच्या

पूर्वी २०० वर्षे तरी-म्हणजे ११ व्या शतकांत कुडाळ शहर हें त्या देशाचें राजधानीचें शहर होतें असा तर्क करण्यास हरकत नाही. वरील चिरंजीव लिखाणाशिवाय, त्या प्रांतांतील ग्रामसंस्था व देवस्थान-पद्धतिसंबंधीं माहिती व कांही जुने कागदपत्र या साधनांवरून प्राचीन कुडाळ देशांत ३६० गांवांचा समावेश होत होता, व बहामनी व आदिलशाही अधिराज सत्तेंत तेथील स्थानिक ब्राह्मण सत्ताधाऱ्यांच्या अमलाखाली तो प्रांत असतांना त्यांत ५९४ गांवांचा समावेश होत होता असें दिसून येतें. यांना "कदिम कुडाळी विलातीचे गाऊ" असें म्हणत. एवढ्या भागांत कुडाळी भाषा बोलली जात असे असें दिसून येतें. म्हणजे देवगडपासून दक्षिणेस गोव्यें प्रांतांतील पांच महाल, व पूर्वेस वरील दक्षिणोत्तरपट्टी इतक्या प्रदेशांत ५०४ गांवांचा समावेश होत असल्यामुळे त्या भागांत प्रचलित असलेली भाषा "कुडाळी" या नांवाने संबोधिली जाते. वरील मर्यादेंतील कांही भाग आजमितीस वरघांट प्रदेशांत मोडत असला तरी सह्याद्री लगतच्या भागांत बोलल्या जाणाऱ्या भाषेंत कुडाळी भाषेंतील कांही शब्द वापरले जात असतात. गोव्यांतील बोलींत तर कुडाळी शब्द प्राचुर्याने आढळून येतील,

## कुडाळप्रांतांत मराठीचा प्रवेश

ह्या भागांत मराठी भाषेचा प्रवेश कधीं झाला, तो होण्यापूर्वी त्यांत कोणती भाषा चालत होती; तेथील प्राचीन रहिवासी कोण होते, यासंबंधी निश्चित माहिती देणें अशक्य आहे. परंतु तेथील परंपरागत चालत आलेला इतिहास, इतिहासाचीं जुन्यांत जुनीं अव्वल साधनें, आचारविचार, संस्कार, धार्मिक समजुती, देवस्थान[१]-पद्धति, यांवरून अनुमान काढतां येण्यासारखें आहे. कुडाळी ही मराठीची एक उपभाषा असल्याचें मागे ठरविल्यामुळे त्या भागांत मराठीचा प्रवेश कधीं झाला तें पाहणें ओघानेच प्राप्त होतें. भाषेच्या उत्पत्तीविषयी विचार केल्यास, ती मुद्दाम बनवून तयार होत नसते, आपोआप क्रमाक्रमाने बनत जाते असें दिसून येईल. खुद्द मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधी भाषाशास्त्राच्या अभ्यासू विद्वानांत अनेक मतें असल्याचें आढळून येतें. पण ती मुळची स्वतंत्र भाषा नसून दुसऱ्या भाषेंतून निघाली याबद्दल मात्र सर्वांचें एकमत आहे.

या भागांत आर्यांची वसाहत होण्यापूर्वी द्रविड किंवा व्रात्य लोकांची तुरळक वस्ती होती व त्यांची भाषा मराठीहून भिन्न होती असें अनुमान होतें. मनुसंहिता, ब्राह्मणग्रंथ यांतून अशा जातींची नांवें मिळतात व दक्षिण पंथांतील यांच्या वसाहतींचीहि माहिती मिळते. या भागांत आर्यांचा प्रवेश पूर्वकालीन चालुक्यांच्या अमदानींत इ. स. च्या ५ व्या शतकाच्या सुमारें झाला असावा. ताम्रपट आणि शिलालेख यांसारखीं इतिहासाचीं अव्वल साधनें पाहिलीं तर, इ. स. च्या ९ व्या किंवा १० व्या शतकापर्यंत निव्वळ मराठी भाषेंत कोरलेला असा एकहि लेख आजवर उपलब्ध झाल्याचें

१ या प्रांतांतील देव-देवतांची संख्या येथील लोकसंख्येएवढी मोठी आहे असें म्हटल्यास फारसें अतिशयोक्तीचें होणार नाही. येथील देवस्थानव्यवस्थाहि या प्रांतात स्वलक्षण आहे. देवदेवतांत आर्यानार्य देवतांचें मिश्रण कुशलतेने केलेलें आढळतें. या व्यवस्थेचा तत्प्रांतीय जनतेवर सांस्कृतिक परिणाम काय झाला तें पाहणें ही महत्त्वाची बाब आहे. परंतु या लेखाचा तो विषय नव्हे. या व्यवस्थेंत एक विशेष गोष्ट अशी आढळून येते की, तींत ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्व हिंदुमात्रास अधिकार व स्थळें नेमून दिलेलीं आहेत. इतकेंच नव्हे तर, परधर्मी (अवैदिक) मानलेल्या जैनांसहि तींत एक स्थळ दिलेलें आढळतें. हें जें जैन स्थळ म्हणून मानलें जातें, तें जैनांचें नसून बसव्याच्या लिंगायत पंथाचें आहे असे शोधाअंतीं दिसून येतें. कुडाळ प्रांताच्या परिसरांत जैन आणि बौद्ध धर्म रुजूच नाहींत. येथील देवस्थान व्यवस्था या प्रांतांतील ग्रामव्यवस्थेशीं इतकी मिळून गेली आहे की पहिलीपासून दुसरी वेगळी करणें अशक्य आहे.

दिसत नाहीं. कुडाळ प्रांतांत सांपडलेले जुन्यांत जुने लेख म्हणजे उपर्युक्त चालुक्यांपैकी मंगलीश, सुप्रसिद्ध पहिल्या विक्रमादित्याचा ज्येष्ठ बंधु चंद्रादित्य याची प्रियमहिषी विजयभट्टारिका, विनयादित्य, व विजयादित्य याचे ६ व ७ व्या शतकांतले असून ते अथपासून इतिपर्यंत संस्कृत भाषेत कोरलेले आहेत. यावरून तत्कालीं ह्या भागांतील लेखनाची भाषा संस्कृत व बहुजन समाजांत बोलली जाणारी भाषा संस्कृत-प्राकृत मिश्रित असावी असें वाटतें. पुढे चालुक्यांच्या राज्यविस्तारामुळें या भागाचा महाराष्ट्राच्या जवळच्या भागाशीं निकट संबंध जसजसा अधिकाधिक येत गेला, तसतसा महाराष्ट्रीचा प्रवेश कुडाळ प्रदेशांत होत गेला हें उघड आहे. वरील माहितीचा साकल्याने विचार केल्यास या प्रांतांत मराठीचा बोलीच्या स्वरूपांतला प्रवेश इ. स. च्या ८, ९ शतकाच्या दरम्यान झाला असें अनुमान होतें. आणि बोलण्यांत दोन अडीच शतकें तरी गेल्यानंतर तिचा लेखनाच्या कामीं उपयोग होऊं लागला असला पाहिजे. दक्षिणापथांत येतांना आर्यांनी आपल्या बरोबर आणलेल्या संस्कृत भाषेचा लेखनांत उपयोग करण्याचा प्रघात सुरू केला. गेल्या हजार वर्षांच्या अलीकडचे जे लेख उपलब्ध आहेत त्यांवरुन अपभ्रष्ट संस्कृत म्हणजे प्राकृत मिश्रित असली तरी दानपत्रें वगैरे लेख संस्कृतांतच होत असत असें दिसून येतें; तथापि सामान्य जनतेस समजण्यास योग्य असे लेख बनवितांना संस्कृतांत किंवा जनपदांत बोलल्या जाणाऱ्या विकृत मराठींत न बनवितां, त्यावेळीं शुद्ध मानलेल्या मराठींतच बनविण्याचा प्रघात इ. स. १२,१३ व्या शतकापासून सुरू झाला असावा असें दिसून येतें. उदाहरणार्थ अशा दोन्ही तऱ्हेच्या लेखांची माहिती पुढे देतों. शके १३५८ (इ. स. १४३६) च्या नागदेव सामंताने दान दिलेल्या एका गांवाच्या ताम्रपत्रलेखांत ३० ओळींपर्यंतची माहिती संस्कृतांत देऊन सर्व लोकांस समजण्यास जरूर असा दानाचा उल्लेख व दत्त भूमीच्या चतुःसीमा मराठींत, पुढील-प्रमाणे दिल्या आहेत. **श्रीभैरवंद (व)...वरडें गिरामा। सर्व नमस्य करुनु दीधले... १३५८ सकु...दत्तं ग्राहम तांब्रसासणं पूर्वदीसे सीमा चिपोलिचेची, उत्र दीसे सीमा चांदेलाची दृषीण दीसे औंजरीयेची सीमा** पसीम दीसे वारपंडीची सीमा." हें दानपत्र राजपुरुषाने दिलें असल्यामुळे त्याचा वरील माहितीशिवाय इतर सर्व भाग संस्कृतांत लिहिला गेला. परंतु एका किल्लेदाराच्या वंशांतील दळवी नांवाच्या अधिकाऱ्याने वरील ताम्रपटाच्यापूर्वी ४० वर्षें म्हणजे शके १३१७ सालीं (इ. स. १३९५) मराठींत कोरविलेली एक लेखशीला आहे, तिची भाषा तत्कालीन शुद्ध मराठी आहे. उदाहरणार्थ तो लेख खालीं देतो.

**१ स्वस्थी श्री शालीवान सकु कु. १३१७ वरखि चीत्रभानु**
**२ संवसर आदीक वेउळ्ळ ३ गुरुवारी चांदगडाजुजीपती तत्यसी**
**३ देषायी दळवै याने याचा पीता भामू सावतु त्यदोदीसी उपभो**
**४ गासी दत वीडा धुपा तेला दीया उपभोगासी दत**
**५ रौप्य टाके १४ आखेरतोपी टांके चौदा उपभोगासी**
**६ देउळाच्य कोभाचा वेचु द्राम १५०० दळवैपणोखे जाले दीनु आर्थे भड[१]-खंबा थापीला दीनुनीधी वेचु द्राम ६०० अख्यरतोवी[२] सासु[३]**
**७ उपभवासी भाम सावता देषायी दळवै यादोद्दीसी भुमा भऱ्यया[३] २ ची भडाची मेर उधुंबृची[४] मेर नैची[५] मेर सडेखडीयेची मेर आभऱ्ययची[६]**

---

१ दीपमाळ; २ अक्षरीं, सह्याशें; ३ "भरा" हें कुडाळ प्रांतांतील एक माप आहे (४ खंडी = १ भरा) ह्याचें अनेकवचनी रूप. ४ औदुंबराची. ५ नदीची. ६ आंबराईची. मेर = सीमा.

यांतील सक्कु, सावतु, दत, दळवे, दीनु, टाके, द्राम, वेचु, हे शब्द जुन्या मराठींतले-१२, १३ शतकांतील लेखांत वापरलेले आहेत. त्यावरून कुडाळ प्रांतांतील ह्या शिलालेखांतील भाषा व त्यावेळीं महाराष्ट्राच्या इतर भागांत लेखनांत योजिली जाणारी भाषा एकसारख्याच होत्या हें दिसून येईल. म्हणून मराठीचा उदय महाराष्ट्राच्या इतर भागांत ज्यावेळीं झाला त्या काळाच्या जवळ जवळ तो कुडाळ प्रांतांतहि झाला असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. बोलण्यांत जरी विकृत रूपाने तत्प्रादेशिक भाषा बोलली जात असे, तरी लेखनांत त्यावेळीं शुद्ध समजली जाणारी मराठीच वापरण्यांत येत असे. तथापि, तत्प्रांतीं बोलली जाणारी भाषा शुद्ध मराठीहून कांहींशी विकृत असल्यामुळे तिचें "कुडाळी" असें जनपदवाची नांव प्रचारांत आलें. या भाषेचा उल्लेख सरकारी शोधकांनी लिंग्विस्टिक सर्वे रिपोर्ट, गॅझेटिअर वगैरे सरकारी दप्तरांतून केलेला आहे. त्यांतील एक उतारा खाली देतों.

"The original language used throughout the state* by Hindus excepting the higher classes, is pure marathi, and was termed "*Kudales*" from its being peculiar to the district of that name and to the southern talooka of the Ramgiri Collector etc"
( Bombay Government Records, Vol X. )

## मराठी शब्दांचें कुडाळ स्वरूप

### आकारान्त नामें ओकारान्त उच्चारलीं जातात

उः—आंबा-आंबो; गरा गरो; मुळा-मुळो; कृष्णा-कृष्णो-करष्णो; इ.

शब्दांतील कित्येक कठोर वर्णांच्या ठिकाणीं मृदु व मृदूच्या ऐवजीं कठोर घातलीं जातात.

उः-इकडे-हक्कडे ("इडे" असेंहि ऐकण्यांत येतें), पाठीं-फाटीं, माझा-माजो, पुढें-फुडें.

एकारान्त नामें आकारान्त उच्चारलीं जातात.

उः—कोळमें किंवा कोळंबें-कोळम्यां; अळमें ( भुइफोड )-अळम्यां, नाणें-नाणां; पानें-पानां; जातें-जांतां; ह्वें-व्ह्यां इ.

मराठी शब्दाच्या शेवटीं "इ" हें अक्षर आल्यास कुडाळींत त्याचें "य" रूप होतें.

उः-समई-समय; घाई-घाय; चतुराई-चतराय; चवई-चवय; इ.

मध्यें "इ" अक्षर आलें तर आणि "य" किंवा "व" अशीं रूपांतरें होतात.

उः—वाईल-वायल; काईल ( कढई )-कावील; नाइक-नायक; हुईण-हुवीण; इ.

ज्ञानेश्वरीकालीन जुन्या ग्रंथांतून आढळणारे व सध्याच्या मराठींत प्रचारांत नसलेले कित्येक शब्द कुडाळींत आढळतात. अभिजात मराठी भाषेंत नसलेले असे शुद्ध कुडाळी शब्दहि बरेच आहेत. अर्थसहित कांहीं शब्द खाली देतों

कुडाळी शब्द अर्थ

१ आवस किंवा आव्स = आई.
२ अजुत = विनचुक.
३ अपितार = चमत्कारिक, विक्षिप्त.
४ अव्हेचो = नवीन, नवतर.
५ आयदाण (आयतन) = भांडें.
६ उपलो = पेरलें (धान्य पेरलें)
७ असकाट = माजलेलें रान. (यांत उंच वृक्षांचा बोध होत नाहीं.)
८ ओस्णेवता = वरवतो. (ज्ञानेश्वरीत अगर स्वापावस्थेत
९ आवणो, विझणो = पंखा(हाताने वारा घेण्य चा

* सध्याचें सावंतवाडी संस्थान. या संस्थानसंबंधीं दिलेल्या माहितींत वरील उतारा आहे. कुडाळ देशाची प्राचीन राजधानी जें कुडाळ शहर तें सावंतवाडी संस्थानांत आज पेठ्याचें एक ठाणें झालें आहे.

१० उपराळो = प्राप्ती
अलंटर = नेकार मनुष्य; धड इकडे ना तिकडे असा
१२ किम्यों = पडसें
१३ कुवरी = फणसाचें फार कोवळें फळ
१४ अंवसर = आंगावर पिशाच्च वाढणें
१५ गजाल = गोष्ट, कहाणी
१६ घोव (गोहो-कदाचित् प्राकृत)=नवरा
१७ घोपाण = शक्ति, ताकद
१८ चेडूं (चेड, चेडू. सं. न.)=मुलगी, पुत्री.
१९ चुडत किंवा चुडित = झांप (नारळीच्या झाडाचें)
२० घराकलो = घाबरला, बावरला
२१ जतनारा, जतनेऊन = काळजीपूर्वक, सांभाळून
२२ जायां = उसनें
२३ जेफा (जाफा या आरबी श. वरून) = फाजील, जास्ती
२४ झील (झिलो, प्रा. पु.) = मुलगा, पुत्र.
२५ दुराय = शपथ
२६ घापु-झालां = फुकट-गेले
२७ निराकार = विचित्र, किंवा पिशाच्च देवता-विशेष
२८ "न्हय" किंवा "नै" = नदी
२९ निस्त्याक = आमटी, सांबारें, कालवण इत्यादि अर्थी.
३० निंबार = ऊन (सूर्याचें)
३१ पांढरो = सर्प
३२ फक = कोवळें फळ
३३ फाल्या = उद्यां
३४ फट = गप्प, खोटी गोष्ट
३५ बिरमत = लचांड, आळ, याअर्थी
३६ बचेरी, भगल = थट्टा, मस्करी
३७ बक्रा = अंमळ
३८ मानाय = चाकर, गडी (वयांत आलेला)
३९ मागारीण = लग्न झालेली स्वतःची बायको
४० मळाब = आकाश (किंवा ढगांनी युक्त असें आकाश
४१ म्हॉव = मधमाशांनी बांधलेलें (मधुयुक्त) पोळें.
४२ मोहोळ = पर्वताचें खोरें (खोल, ससखोल-इतिहासांत)
४३ यस्वार = मसाला (त्यांत मिर्ची असली पाहिजे)
४४ यद्दां = एव्हां
४५ लखणी = झोंप
४६ वाडवण = केरसुणी
४७ वामोग = कौतुक
४८ वळेसर = फुलांचा गजरा
४९ होकाल = नवरी, नओढा (विवाहाला योग्य झालेली)
५० होंपळी = कोवळे सूर्यकिरण आंगावर घेणें

मराठींतील जोडाक्षरांचे शद्ब कुडाळींत फोडून उच्चारिले जात असतात. उदाहरणार्थः—पृथ्वी=पिर्थम् किंवा पिर्थुम्; ब्राम्हण=बामण; पराक्रम=पराकरम; कृपा=करपा; ताम्रपट=तामरपटो; प्रांत=परांत इ०

कुडाळीभाषा लेखनांत उतरविल्यास तिची वाक्यरचना कशी दिसेल तें सांगूं.

## कुडाळभाषेचा नमुना

नवशीं वर्सांच्या सुमाराक देवसर्मा नावाचो आदगौड बामण भागिरथीच्या तडीवरसुन परवास करीत करीत दक्शिन कोंकनांत इलो, आणी आतांच्या देवगडाकडच्या हिंदळ्यागांवांत आपल्या परवारासकट रवलो. हिंदळ्याजवळच कुणकेश्वर म्हादेवाचां सैम[१] थळ[२] आसा, तेची शेवाचाकरी तेनां केली. तेच्या करपेन त्या बिरामनाचो येलइस्तार वरोच वाडलो. त्या वेळाच्या कदमांच्या राज्यांत तेचे झील[३], नातू मोठ्या अदिकारार चडले. पयल्यान् ते कदम राजांचे मांडलिक व्हते, म्हनान् त्यांचां आडनांव "सामंत" असां पडलां. तेंच्या वंसांत माइनदेव हुतुन एक मोट्टो पराकर्मी पुरुस जालो. त्यानां भऊत लडायो मारुन आपल्या परजेंत आबादी आबाद केली, व परजेक भऊत सुक लाबेलां

१ सैम = स्वयंभु. २ थळ = स्थळ. ३ झील = पुत्र.

हुतून लोकै त्याकां देवा सारको मानुंक लागले. तेच्या पराक्रमांचा वर्नान, तेच्या वंसांतलो नागदेव ह्यानां काळकादेवीक पांचशीं वर्साच्या सुमाराक एक गांव दान दिलो, त्याच्या तामरपत्रांत खूब केला आसा. माइन्‌ग्यावान् जादव राजांचां मांडलिकपाण झुगारून, कुडाळदेस आनि आयलो पैंलो बरोच मुलुक हेचो तो सवताम्हाराजो बनलो.

कुडाळी भाषेंतील कांही शब्दांचे हिंदी व बंगाली भाषांतील शब्दांशीं, उच्चारांत बरेंच साम्य दिसून येतें. त्याचीं कांही उदाहरणें खालीं देतों.

| बंगाली | कुडाळी | मराठी | हिंदी | कुडाळी | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| आछोला | असोलो-ल्यो | न-सोललेला | आताहूं | येतंय | येतों |
| आलुनी | आळुणी | अळणी | उठताहूं | उठतंय | उठतों |
| बासि | बासँा | शिळें | एकठ्ठे | एकठंय | एका ठिकाणीं |
| मेक | मेक्ख | खुंटी | कहांपर | खैंसर | कोठें |
| मौ | म्हाँव | मध | खाताहै | खाताहा | खातो, खात आहे |
| कांकर | कांकर | चामड्याची | घरको | घराक | घराला |
| | | वादी | चलताहूं | चलतहंय | चालतों |
| गाद | गाद | गाळ | जाताहूं | जातंय | जातों |
| सांको | सांक | लांकडी पूल | जाको | ज्याकां | ज्याला |
| सांडशी | सांडशी | चिमटा | तुमको | तुमकां | तुम्हांला |
| सोहागिनी | सोभागणी | सौभाग्यवति | भीतर | भितर | आंत |
| | | | यहांपर | हैंसर | येथें |
| | | | मैंको, मेको | माकां | |

बंगालींत जसा 'अ' या स्वराचा किंचित् 'ओ' सारखा करितात तसा कुडाळींतील कांही शब्दांचा करण्यांत येतो. उ. 'सरप' या शब्दाचा उच्चार 'सोरोप' असा कुडाळींत होतो. बंगालीप्रमाणें 'ब' आणि 'व' यांचा उच्चार केव्हां केव्हां 'व' असा करण्यांत येतो. जसें अपूर्व-अपरुव; अपूर्वाई-अपूवाय; विवत, मळवट, बन, इ.

कुडाळी भाषेची वाक्यरचना मराठी भाषेच्या नियमांस धरून असते हें मागे सांगितलेंच आहे. या भाषेंतील बहुतेक शब्द मराठी व संस्कृत भाषांतील शब्दांचीं विकृत रूपें आहेत. हिंदी, बंगाली व कानडी या भाषांतील शब्दांशीं साम्य असलेले शब्दहि क्वचित् आढळतात.

## क्रियापदांचीं रूपें

| शुद्ध मराठी | कुडाळी |
|---|---|
| तो जात आहे | तो जाता हा |
| मीं जात आहें | मीं जात हँय(उच्चारांत "जातँय" 'हं'. चा लोप होतो) |
| तूं जात आहेस | तूं जातहस (उच्चारांत " ह " चा लोप होऊन "जातस" असें म्हटलें जातें) |
| तो चालत जात असेल | तो चालत् जात आसात् |
| तो वाचीत बसला असेल | तो वाचीत बसलो आसात् |
| तो मला भय घालितो | तो माकां भय घालता |

## विभक्ति प्रत्यय

**द्वितीया** स, ला, तें, (नामाच्यापुढे) क (सर्वनामाच्या पुढे) कां

उ. { रामा-स-ला-तें = रामाक
मला, तुला, त्याला = माकां, तुकां, त्याकां }

तृतीया नें, शीं = सामान्य किंवा विशेषनामाच्या पुढे-
'न,' 'शीं'. सर्वनामाच्या पुढे-"णा," "शीं"

उ. रामानें, रामाशीं = रामान्, रामाशीं
तिनें, त्यानें, त्याशीं = तिणां त्याणां, त्येशीं
म्यां, त्वां = मियां, तुयां

पंचमी ऊन, हून = हून. सून
पेक्षां = पक्षीं

उ. ह्याहून, मुंबईहून = हेहून, मुंबयसून
ह्यापेक्षा = ह्यापक्षीं

षष्ठी चा, ची, चें = चो, ची, चां

उ. कुडाळचा, कुडाळची कुडाळचें = कुडाळचो, कुडाळची, कुडाळचां

सप्तमी त, ई, आं = "त" (आंत), भितर* किंवा भितुर अथवा भुतुर.

उ. डोळ्यांत = डोळ्यांभितर, डोळ्यांभितुर, डोळ्यांभुतुर

* भितर, भितुर अथवा भुतुर हे प्रत्यय उच्च वर्णाच्या लोकांकडून वापरले जात नाहीत.

## कुडाळ प्रांतांतील मराठी लेखक

या प्रांताला लेखकांचें सौभाग्य बेताचेंच असल्याचें दिसून येतें. तथापि गल्या दोन अडीचशें वर्षांपासून तों आतांपर्यंत ज्यांची माहिती आम्हांस आहे त्यांचीं नांवें पुढे देतों.

### कवि व संत

१ गोपाळ बोध मळगांवकर. २ श्री. प. चिदानन्दस्वामी, ३ सोहिरोबा आंबिये, ४ श्रीआनंदनाथ, ५ श्री. प. वासुदेवानन्द सरस्वतीस्वामी, ६ श्री. प. पद्मनाभतीर्थस्वामी.

### इतिहाससंशोधक व इतर वाङ्मय निर्माण केलेले

१ डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, २ रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, ३ प्रो. शांताराम अनंत देसाई, ४ महाराष्ट्राचे संपादक श्रीयुत ओगलें, ५ महाराष्ट्रभाषाभूषण जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर, ६ विठ्ठल कृष्ण नेरूरकर, ७ वि. स. खांडेकर, ८ गोपाळराव विठ्ठल तिरोडकर (कुडाळ), ९ देवराव गंगाधर खानोलकर. १० अनंत वासुदेव मराठे. ह्या लेखकांनी मराठी भाषेची सेवा केली व कित्येक आज करीत आहेत. परंतु त्यापैकीं बहुतेकांनी कुडाळ प्रांताच्या बाहेर राहून ही सेवा केली आहे.

### वाङ्मयसंस्था

वाङ्मयसेवेस वाहिलेल्या संस्था कुडाळ प्रांतांत पूर्वी असल्याचें आढळत नाहीं. अलीकडे कुडाळ, मालवण, सावंतवाडी ह्याठिकाणीं वाङ्मयमंडळें स्थापन झाल्याचें ऐकतों, परंतु तीं प्रासंगिक असून नाममात्र आहेत. याचें कारण असें दिसतें की, वाङ्मयसेवेस प्रोत्साहन अगर आर्थिक साहाय्य मिळण्यासारखी त्या प्रांताची आर्थिक अगर शैक्षणिक परिस्थिति नाहीं. ज्यांना वाङ्मय सेवेची हौस अगर आवड आहे ते मुंबई, पुणें किंवा सोयीच्या इतरजागीं जाऊन, इतर विद्वानांनी चालविलेल्या संस्थांत सामील होतात किंवा त्या प्रांतांत शहरांच्या आश्रयाने राहून आपआपल्या कुवतीप्रमाणे वाङ्मयसेवा करितात.

### भावी कालांतील आकांक्षा

ही उपभाषा प्रादेशिक नांवाने प्रथित आहे म्हणून, किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणाने मराठीपासून कायमची विभक्त राहावी अशी आकांक्षा त्या प्रांतांत कुठेहि वसत नाही. उलट शुद्ध मराठीच्या प्रचाराकडे व वाङ्मयनिर्मितीकडे सुशिक्षित जनतेचा ओढा जास्ती आहे. बहुजन समाजांत शिक्षणाचा प्रसार जसजसा जास्त होत जाईल तसतसे हें ध्येय अधिक समीप येत जाईल यांत शंका नाही.

# शुद्धिप्रभखंडननिरास

( लेखक- गो. कृ. मोडक )

(मागील अंकावरून चालू)

**( ग ) आभासनिरास**— रा. निजसुरे यांचें अपूर्व स्वरोच्चारशास्त्र त्यांच्या विधानाचें समर्थन करीत असेल; पण मराठी भाषा येथील रूपविकाराच्या सर्वस्वीं विरुद्ध आहे. ऋ हा स्वर मराठी भाषा बोलणारांना मोठें संकट वाटतो. मारवाडी वगैरे जातींचे तर मराठी भाषा बोलणारे लोक र्-चा ऋ नव्हे तर उलट ऋ-चा र् उच्चारतात. ते कृष्ण-चे स्थानीं प्रायः ऋष्ण म्हणतात. आपण महाराष्ट्रीयहि ऋ-चा उच्चार टाळण्याचा प्रयत्न नकळत करीत असतों. संस्कृत तृण, शृंखला, शृंग, ऋक्ष, भृंग, वृक्ष, मृतक, या शब्दांचीं रूपांतरें यथाक्रम तृण, सांखळी, शिंग, रीस ( अस्वल ), भुंगा, रूख, मेला अशीं आपण मराठींत करितों. अलीकडे संस्कृताच्या वाढत्या परिचयानें आपण ऋकार कायम ठेवीत असलों तरी, तो मराठीचा स्वभाव नव्हे. ऋ-च्या स्थानीं एखादें स्वरांतर करणें, हाच मराठीचा स्वभाव. या स्वभावानुसार शतक्रतु याचें रूपांतर चुकीनें शत-कृत्य असें उलट कधींच होणार नाहीं. करितां येथें उच्चारसौलभ्याहून निराळेंच तत्त्व प्रभावी मानिलें पाहिजे. हें तत्त्व म्हणजे विवक्षित अर्थ शब्दाच्या अवयवांतून काढणें. एतदर्थच मराठी बोलणारास अपरिचित असलेल्या क्रतु शब्दाचे स्थानीं कृत्य हा शब्द जाणूनबुजून योजण्यांत आला आहे.

७ **( क ) विधान**—मराठींतील प्रसिद्ध एतदर्थक महशूर हा शब्द यवनी भाषेंतील मशहूर या शब्दापासून आला आहे. यांतील वर्णविपर्ययाचें कारण पुढील-प्रमाणे आहे. विवक्षित अर्थ शब्दाच्या अवयवांतून निघावा व हा अर्थ शब्दाच्या अर्थास यावच्छक्य अनुरूप असावा, ही भावना येथील वर्णविपर्यायाचे मुळाशीं आहे.

**( ख ) खंडनाभास**—येथील रूपांतर केवळ वर्णविपर्ययानेच सिद्ध होतें. वर्णविपर्ययास कारण शोधण्याचें प्रयोजन नाहीं.

**( ग ) आभासनिरास**—खंडकास वर्णविपर्यय कबूल; पण त्याला कारण शोधणें पसंत नाहीं. अशा रीतीनें कारण यावच्छक्य न पाहणें म्हणजे जिज्ञासेचा नाश करण्यासारखें आहे. दरशाच्या पलीकडे काय असावें, हें जाणण्याची इच्छा ज्ञानाच्या प्रगतीस अत्यंत अवश्य आहे. तेव्हा वर्णविपर्ययावर संतुष्ट न राहतां, त्याचेंही कारण पाहणें हें युक्तच ठरतें. शिवाजीची पूर्वपीठिका सांगतांना त्याचा बाप शहाजी होता, एवढ्यावरच संतुष्ट न राहतां, शहाजीचा बाप कोण, त्याचा कोण, त्याचाही कोण, अशी प्रश्नपरंपरा यावच्छक्य मागें नेण्याचा इतिहासज्ञांचा प्रयत्न असतो. अशा प्रय-

त्याच्या आभावीं इतिहासज्ञानाची वाढच खुंटेल. कारणाची एकच पायरी चढून तेथेच संतुष्ट होऊन बसणाऱ्या अशा खंडनकारासारख्यांच्या संबंधाने काय म्हणावें ? तान्प्रति नैषयत्नः—याहून दुसरें काय म्हणणार ? मह्शूर या रूपांतरांतील अवयव मनांत येऊन मोठा आणि शूर या कल्पना मनांत उदित होतात व 'प्रसिद्ध' या कल्पनेस या दोन्ही पोषकच आहेत. यामुळेच येथे वर्णविपर्यय झाला असावा. शब्दाचा अर्थ स्वयमेव सिद्ध न मानतां, तो अवयवांतून निघेल तर बरा, अशी मनुष्याची प्रवृत्ति असते. हिला अनुसरून म्हणजे अवयवार्थ–निष्कर्ष ( अवयवांतून अर्थ काढणें ) व अवयवार्थाचा समस्त शब्दाच्या अर्थाशीं मेळ घालणें ( कल्पनासंवाद ) या गोष्टी येथें वर्णविपर्ययास कारणीभूत झाल्या आहेत.

८ (क) **विधान** क या वर्णाचा उल्लेख ककार या रूपाने करतात; तसा र्-चा उल्लेख रकार या रूपाने होतो. पण संस्कृत व्याकरणास हें संमत नाही. र् वर्णाचा निर्देश रेफ या शब्दाने करावा असें त्यांत मुद्दाम सांगितलें आहे. एवं शास्त्रतः रेफ व व्यवहारतः र-कार हे दोन शब्द योग्य ठरतात. रफार हा संकरज शब्द त्याज्य होय.

(ख) **खंडनाभास**–रेफ ह्या शब्दांतील फ आणि रकार या शब्दांतील आर यांच्या संमिश्रणाने रफार बनला आहे. करितां रेफापेक्षां रफार हाच ग्राह्य ठरतो.

(ग) **आभासनिरास**–खंडनकार म्हणतात रफार ही संज्ञा दोन संज्ञांच्या संमिश्रणापासून झाली आहे. कबूल. पण पुढील अनुमान मात्र चूक आहे. ना पुरुष, ना स्त्री, अशी तृतीय प्रकृतीची व्यक्ति आपण सन्मान्य मानीत नाही. एक पुरुष तरी असावा, किंवा स्त्री तरी असावी. पण असली संमिश्रणोत्पन्न व्यक्ति आदरणीय नाही. खंडनकारास तीच दुसऱ्या दोहोंहून श्रेष्ठ वाटते. 'भिन्नरुचिर्हि लोकः' एवढेंच या संबंधांत म्हणावें. टाकाचें टोक या अर्थी Nib याचें मराठी रूपांतर मुलें चुकीने नीफ् असें करितात. हें सर्वस्वीं त्याज्य आहे, असेंच कोणी म्हणेल. पण तें ऐकून खंडनकार म्हणतील नीफ् हेंच रूप सरस आहे. कारण या रूपांतील अवयव नि हा Nib यावरून आला आहे, व फ हा अवयव फांटा (म्हणजे विशिष्ट प्रकारची लेखणी) यांतून आला आहे. खासें समर्थन! 'येन केन प्रकारेण यत् किमपि रूपं शुद्धं भवेत्' शिवाय रफार हें रूप कितीतरी कर्णमधुर! मात्र त्याची माधुरी खंडकच जाणणार.

९ (क) **विधान**–गणितविद्या म्हणजे त्याला हातचा मळ आहे. अशा प्रयोगांतील हातचा मळ हा शब्द हस्तामलक या शब्दाचें रूपांतर आहे.

(ख) **खंडनाभास**–प्रस्तुत शब्दप्रयोग संस्कृतोत्पन्न नसून, मराठींतच हातचा मळ याच रूपाने प्रादुर्भूत झाला आहे.

(ग) **आभासनिरास**–आपण पौरस्त्य लोक सामान्यतः पुष्कळ वेळां अनवाणी चालत असल्यामुळे, आपले पायाचे तळवे वारंवार मळतात. याच प्रचारास अनुसरून पायाची धूळ, चरणरज, इत्यादि शब्दप्रयोग मराठींत आहेत. उलट—हस्तरेणु,

करधूलि, पाणिरजः असले शब्द आपल्या वाङ्मयास अपरिचित आहेत. तेव्हा म्हणीमध्ये मळ या शब्दाचें ग्रहण झाल्यास, तें **पायाचा मळ** अशा रूपाने व्हावें. हातचा मळ अशा रीतीने होण्याचें कारण नाही. मग असला शब्दप्रयोग प्रवृत्त करणारे कुंभार किंवा झाडुवाले असतील तर नकळे. पण अशांनी प्रवृत्त केलेला भाषाप्रयोग शिष्टादृत झाला असेल, असें वाटत नाही. हस्तामलक या नांवाचा शंकराचार्यांचा एक शिष्य होता. तेव्हा करतलामलक या प्रयोगाप्रमाणे हस्तामलक हा प्रयोगही सुखदर्शनीय वस्तूचा वाचक म्हणून प्रचारांत असावा. यापैकी उत्तरोक्त शब्द मराठी वाङ्मयांत आढळत नाही, एवढ्याच कारणास्तव, तो प्रचारांत नव्हताच, असें मानणें केवळ धाष्टर्य आहे. हस्तामलक हें विशेषनाम का असेना, पण त्याची प्रवृत्ति कोणत्या अर्थाने झाली असावी? करतलामलक याचें जें प्रवृत्तिनिमित्त तेंच हस्तामलक याचें असावें, हें निश्चित आहे.

१० (क) **विधान**—सुबन्त ही संज्ञा विभक्तिप्रत्ययान्त शब्दास संस्कृतांत लावितात; याचें कारण विभक्तिप्रत्ययानाच सुप् ही संज्ञा व्याकरणांत गृहीत आहे. पण मराठींत सुप् याने विभक्तिप्रत्ययाचा अर्थ बोधित होत नसल्यानें, सुबन्त ही संज्ञा मराठींत वापरणें योग्य नाही.

(ख) **खंडनाभास**—सुबन्त या संज्ञेचा विवक्षित अर्थ मराठींत लक्षणेनें घेतां येईल. करितां विभक्तिप्रत्ययान्त शब्द म्हणजे सुबन्त असें समीकरण मराठींत घेण्यास हरकत नाही.

(ग) **आभासनिरास**—व्याकरणांतील ज्या संज्ञा केवळ रूपाश्रित आहेत त्या त्या भाषेंतच योग्य होत. इतर भाषांत त्यांचा प्रयोग करणें अयोग्य होय. हें योग्य मानिल्यास तो जात होता यांतील जात हें रूप ing प्रत्ययान्त मानण्यास काय हरकत आहे? कारण जात याचा इंग्लिश पर्याय going असा आहे. [illegible] मताप्रमाणे जात या रूपास त-प्रत्ययान्त धातूसाधित न म्हणतां, इंगन्त [illegible] म्हणावें. बसलेला असें लेला-प्रत्ययान्त भूतविशेषण खंडकांच्या मतानें क्त-प्रत्ययान्त ठरेल. कारण बसलेला याचा संस्कृतपर्याय उपविष्ट यांतील त प्रत्ययास प्रतियोगी म्हणून मराठींत लेला प्रत्यय आला आहे. शिवाय कांही कारणाकरितां या त-चा उल्लेख व्याकरणांत क्त असा करितात. म्हणून बसलेला अशा रूपांना **क्तांत** म्हणावें लागेल. 'हें कोण जाणता आहे?'

११ (क) **विधान**—कमिटीवर नेमणे, व्यायाम घेणें, काळजी घेणें इत्यादि शब्दप्रयोग केवळ इंग्रजी अनुकरणाने उत्पन्न झाले असून, मराठीच्या सरणीस विरुद्ध असल्याने त्याज्य होत.

(ख) **खंडनाभास**—सदरील शब्दप्रयोग इंग्रजींत प्रवृत्त झाले, त्यांच्या मुळाशीं इंग्रज लोकांचे मानसिक व्यापार कारण असणार; व इंग्रजांचे मानसिक व्यापार

आपल्या महाराष्ट्रियांच्या मानसिक व्यापारांहून भिन्न नसल्यामुळे, हे शब्दप्रयोग जसे इंग्रजीत योग्य आहेत, तसेच मराठींतही योग्य मानण्यास हरकत नाही.

(ग) आभासनिरास—शब्दप्रयोग करतांना त्याच्या मुळाशी असणारे मानसिक व्यापार सर्व राष्ट्रांत सारखेच असणार, हेंच मत सदोष आहे. व्यापारांचें एकविधत्व असतें तर, एकच क्रिया सर्व भाषांतून एकाच प्रकारच्या धातूने (म्हणजे सकर्मक किंवा अकर्मक) व्यक्त झाली असती; व एकंदरींत दुसऱ्या भाषा शिकण्याचें काम सर्वत्रच पुष्कळ सोपें झालें असतें. पण असें मनोव्यापारैक्य आढळत नाहीं. या व्यापारांमध्ये त्या त्या राष्ट्राच्या परंपरेने झालेला बदल आढळतो. भिणें ही एकच कल्पना नैसर्गिक असल्याने, सर्व राष्ट्रांतील लोकांच्या मनांत असणारच. अर्थात् खंडनकारांच्या मताप्रमाणे ती कल्पना एकाच प्रकारें व्यक्त होणार. पण अशी स्थिति नाही. A cow fears a tiger, गौः व्याघ्रात् बिभेति, गाय वाघाला भिते,—येथें एकच, नैसर्गिक, समाजाच्या अत्यंत बाल्यावस्थेपासून अनुभूत असणारी अशी, भिणे ही कल्पना इंग्रजींत सकर्मक धातूने, तर संस्कृतांत अकर्मक धातूने व्यक्त झाली आहे. शिवाय भीतीच्या प्रभावाची म्ह० उगमाची विभक्ति संस्कृतांत पंचमी आहे, तर मराठींत चतुर्थी आहे. या विसंवादाचा मेळ खंडकांच्या मनोव्यापारांच्या एकविधतेशी कसा बसणार? The master gets angry with a servant, स्वामी भृत्याय कुप्यति, धनी चाकरावर रागावतो; येथील भाषात्रयांत कोठें कोपविषयाची चतुर्थी आढळते, तर कोठें त्याच्या ठिकाणीं तृतीयेचें किंवा सप्तमीचें अस्तित्व भासतें. मनोव्यापार एकविध असते तर असा प्रकार घडला असता काय? करितां केवळ परकी भाषेच्या वळणानुसार मराठींत शब्दप्रयोग योजणें योग्य नाही.

१२ (क) विधान—कालाच्या ओघाबरोबर सुखोच्चारतेकडे मनुष्याची प्रवृत्ति स्वाभाविकच होत जाते. या प्रवृत्तीमुळे शब्दाचीं रूपें बदलत जातात. सुखोच्चार साधण्याकरितां जोडाक्षरांतील एकच व्यंजन राखण्यांत येतें. शब्द-साद, चक्र-चाक, पत्रम्-पातें, वेत्र-वेत हीं रूपांतरें याच प्रवृत्तीचीं द्योतक आहेत. यावरून सामान्य सुशिक्षिताचा असा समज झालेला आढळतो की, जोडाक्षरयुक्त रूप तें संस्कृत; व तद्भिन्न तें मराठी, व म्हणून अशुद्ध. पण ही कल्पना सर्वस्वीं खरी नाहीं. तरी पण या वृथा कल्पनेस बळी पडून, नाहीं त्या ठिकाणीं जोडाक्षर योजण्याची संवय कांही कांही शब्दांत आढळते. अर्थात् या भ्रांत कल्पनेने बनविलेलीं रूपें त्याज्य होत, मग तीं कितीही दिवस प्रचारांत असोत. भाषेच्या नैसर्गिक ओघाच्या विरुद्ध हीं रूपांतरें असल्याने तीं दोषार्ह आहेत. बोलणाराने त्यांचा त्याग करणें किंवा रक्षण करणें, ही त्याच्या मर्जीची गोष्ट आहे. पण अशा रूपांच्या दुष्टत्वाची तात्त्विक चर्चा केव्हाही उद्बोधक व आदरणीय होणार. या भावनेस अनुसरून चरित्र, दुष्ट, निद्रिस्त वगैरे शब्द सदोष होत.

(ख) खंडनाभास—रूप सदोष असो वा निर्दोष असो, तें बोलण्यांत स्थिर होऊन तें लेखनांत आलें म्हणजे शुद्ध ठरलेंच पाहिजे.

# पुस्तकपरीक्षण

## प्रो. पंगु व नलदमयंतीस्वयंवराख्यान

मी संपादित केलेल्या नलदमयंती-स्वयंवराख्यानाच्या पुस्तकांवरील प्रो. पंगु यांचा अभिप्राय महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या गेल्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील कांही विधानें सामान्य वाचकांची दिशाभूल करण्याजोगीं आहेत तर कांही चूक आहेत. तेवढ्यांनाच फक्त खालीं उत्तरें देत आहे. सध्या रघुनाथपंडित व त्यांचें काव्य याबद्दल बरीच चर्चा चालू आहे; त्या चर्चेला मदत व्हावी हाच हेतु खालील दोन शब्द लिहण्यांत आहे.

प्रो. पंगु यांचा आक्षेप :— फार काय पण प्रतींच्या बाबतींतहि इंदूरच्या श्री. सरवट्यांनी काढलेली काव्याची प्रत श्री. पारसनीसांच्या गांवींहि नाही याचें आश्चर्य वाटतें.

उत्तर :— प्रस्तुत आख्यान संपादित करण्याचें ज्या वेळीं ठरविलें त्या-वेळीं पुणें व मुंबई येथील प्रमुख वाचनालयें व प्रसिद्ध बुकसेलर्स यांचेकडे या आख्या-नाच्या निरनिराळ्या प्रतींबद्दल चौकशी केली आणि बहुतेक सर्व प्रति ( 'सत्संग' प्रत वगळून ) तुलनात्मक अभ्यासाकरितां आणविल्या. प्रो. पंगु यांनी निर्दिष्ट केलेली श्री. सरवटे यांची प्रत या इतक्या ठिकाणीं मला मिळाली नाही एवढेंच नव्हे तर मुंबईचे साक्षेपी लेखक रा. प्रियोळकर यांनाहि ती मिळाली नाही. तेव्हा ही प्रत मला मिळाली नाही याचें प्रो. पंगु यांना आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. कारण त्या प्रतीची प्रसिद्धि बेताचीच दिसते. दुसरें असें की, तुलनात्मक अभ्यासाच्या दृष्टीने ती प्रत निरुपयोगी आहे. कारण नवनीतांतील आख्यानाचें तें पुनर्मुद्रण (Re-print) आहे असें ती प्रत ज्यांनी पाहिली आहे अशा एका व्यासंगी गृहस्थांनी मला सांगि-तलें आहे.

आक्षेपः— रा. पारसनीस यांनी दिलेली रघुनाथपंडिताची माहिती जरी निर्माल्यवत् झाली असली तरी ती एकत्र करण्याचें श्रेय त्यांना लाभलें आहे.

उत्तरः— प्राचीन काव्यें किंवा इतर ग्रंथ संपादन करावयाचें असलें म्हणजे प्रारंभीं किंवा लेखक याबद्दल कोणीहि झालें तरी उपलब्ध असलेल्या **निश्चित** माहिती-चाच संग्रह करणार. सध्या जो प्रश्न विवाद्य आहे त्याचा अंतर्भाव उपोद्घातांत केला नाही हा दोष होऊं शकत नाही. तसेंच पाहूं गेले तर रघुनाथपंडिताचा काळ, त्याची वाङ्मय सेवा, त्याच्या आयुष्यांतील ठळक प्रसंगांची निश्चित माहिती इत्यादि हकीकती-मध्ये शेष काय भर पडली आहे !

आक्षेपः—प्रस्तुत काव्यांतील काव्यगुणांचें सविस्तर दिग्दर्शन येथे करणें त्यांना ( पारसनीसांना ) अशक्य कां वाटलें कळत नाही.

उत्तर—मूळ काव्य ४१ पानांचें आहे. या काव्याचें विवेचन दहापासून शंभर पानापर्यंत करणें अशक्य नाहीं. उपोद्घाताला मीं २४ पानें खर्ची घातलीं आहेत आणि त्यांत मला ज्यांचें विशेष महत्त्व वाटलें अशा मुद्यांचा उहापोह केला आहे. परंतु उपोद्घाताला मर्यादा ही आहेच ना? खुद्द प्रो. पंगु यांनी महानुभावी वच्छहरण नांवाचें काव्य संपादित केलें आहे. तें काव्य ४० पानांचेंच आहे आणि प्रो. पंगु यांनी त्याला लिहिलेला उपोद्घात वीस पानांचा देखील नाहीं; परंतु त्यामुळें त्यांच्या नमुनेदार उपोद्घाताला कांहीं वैगुण्य आलें आहे असें आम्हांस वाटत नाही. त्यांनी ज्या गोष्टींची चर्चा केली नाही त्याचा निर्देश करून या विषयावर तुम्ही का लिहलें नाहीं अशी पृच्छा त्यांना करणें असमंजसपणाचें झालें असतें. कवि व संपादन-रूपांत प्रसिद्ध होत असलेलें काव्य यासंबंधीं प्रमुख गोष्टींचा उल्लेख उपोद्घातांत आला आहे किंवा नाही एवढ्याच दृष्टीने पुस्तकाला जोडलेल्या उपोद्घाताचें परीक्षण करावयाचें असतें. महत्त्वाच्या प्रश्नांना बाजूला सारून अनवश्यक गोष्टींची चर्चा उपोद्घातांत केली असती तर गोष्ट निराळी. परंतु त्यांतील एखादाहि भाग प्रो. पंगु यांना निरर्थक वाटत नाहीं; कारण तसें असतें तर त्यांनी त्याचा उल्लेख केला असता.

यानंतर प्रो० पंगु यांनी टीपेंतील ९ स्थळें घेऊन त्यांच्यावर टीका केली आहे. टीपा कितीहि काळजीपूर्वक लिहिल्या तरी त्यांत मतभेदाला वाटेल तितका वाव सापडतो. परीक्षणकर्त्याला नवीन अर्थ सुचविणें किंवा दिलेला अर्थ सुधारून देणे केव्हाहि शक्य असतें. आतापर्यंत ज्यांनी ज्यांनी प्रस्तुत पुस्तकावर अभिप्राय दिले आहेत त्यांनी अशा तऱ्हेचे अर्थ सुचविलेच आहेत; परंतु ते कोणत्या भाषेंत आणि कशाप्रकारें सुचवावयाचे हा ज्याच्या त्याच्या मनाचा धर्म असतो; त्याबद्दल वाद घालण्याचें कारण नाहीं. परंतु अशा चर्चेमधूनच तत्त्वबोध होत असतो, आणि तोच अनुभव प्रस्तुत आख्यानाच्या बाबतींतहि आला आहे. असो, प्रो० पंगु यांनी सुचविलेल्या अर्थांकडे आता वळूं.

श्लोक ४९:—प्रस्तुत आख्यानांत एकंदर सहा पदें ( क्रमांक ४९, ७१, ८९, १८३, १८५ आणि २०४ ) आलीं आहेत. प्रत्येक पदांत रघुनाथाचा उल्लेख आला आहे.

४९:—आतां सोडवि मज रघुनाथा ।

७१:—दूत तुझा परि मीच सुखी करवीन म्हणे रघुनाथनुता ।

८९:—ख्यात असे नळराज कथा रघुनाथकवीन्द्रनुता ।

१८३—रघुनाथाचा पूर्वज भला, नामें भगीरथ ऐकिला ।

१८५:—करुणा; रघुनाथा, येईचना ।

२०४—स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन आदरावें ।

श्रीराम हे रघुनाथपंडिताचे आराध्यदैवत असावें. परंतु श्रीरामाच्या इतर नांवांचा उल्लेख न करतां प्रत्येक ठिकाणीं कवि 'रघुनाथ' या नांवाचीच निवड करतो. वरील सहापैकीं तीन ठिकाणीं ( ७१, ८९ आणि २०४ ) कवीने स्वतःच्या नांवाचा उल्लेख केला आहे. बाकीच्या तीन ठिकाणीं 'रघुनाथ' शब्दाने आपल्या कुलदैवताचा उल्लेख केला आहे. एका पदांत तर ( १८३ ) दात्याची परिगणना चालू असतांना मुद्दाम भगीरथाचा उल्लेख केला आहे; आणि त्या निमित्ताने 'रघुनाथ' हा शब्द आणिला आहे. यावरून असें वाटतें की, रघुनाथ हा शब्द कुलदैवत म्हणून योजतांना देखील जातां जातां आपल्या नांवाची परिस्फुटता कवीला करावयाची आहे. शिवाय हीं सर्व स्थळें पदांत आहे; म्हणजे पद गाऊन दाखवीत असतांना तें पद कोणाचें आहे हे श्रोत्यांना सहज कळावें असाहि हेतु असण्याचा संभव आहे. हा माझा एक तर्क आहे; आणि म्हणूनच मी श्लोक ४९ च्या पुढे प्रश्नार्थक वाक्य घातलें आहे.

श्लोक ५१:–यांतील 'शोकशाळा' या सामासिक शब्दाचा बरोबर अर्थ काय करावयाचा हा प्रश्न आहे. फलितार्थ स्फुटतर आहे. 'शाळा' शब्दाचा बुंधा हा अर्थ येथे घेतां येत नाही असें मी टीपेंत म्हटलेंच आहे; तेव्हा तो अर्थ माझ्या माथीं मारून त्यावर केलेली टीका अनाठायीं आहे.

श्लोक ७१:–वीज अचंचल इत्यादि पंक्तीचा अर्थ बरोबर लागत नाही. प्रो. पंगु यांचा अर्थ स्वीकारला तर तजवीज हा शब्द निरर्थक ठरतो. तसेंच "नूतन-नीरजनूतमुखी" वगैरे पंक्तीचा अर्थ प्रो. पंगु यांनीं सुचविल्याप्रमाणे घेतला तर दमयंती ही इंद्राणीची सखी आहे आणि म्हणून ती सुंदर आहे असा अर्थ होतो, आणि मी दिलेल्या अर्थाइतकीच याहि अर्थाला तर्कशास्त्राची जरूरी लागते. दोन्ही अर्थांची सारखीच शक्यता असतांना अमुक एक चूक आणि अमुक ग्राह्य असें अट्टाहासाने न सांगतां दोन्ही अर्थ पुढे ठेवून त्यांची ग्राह्याग्राह्यता ठरविणें तज्ज्ञ वाचकांच्याकडे सोपविणें युक्त होईल.

श्लोक ११७:–प्रो. पंगु या श्लोकाचा अर्थ असा करतातः—" नैषधकथारूपी लोण्याचा गोळा दमयंतीच्या जिभेवर होता म्हणजे नलकथा तिच्या जिभेवर होती, ती हंसागमनाने ओठांवर आली व ती भाषणरूपाने बाहेर आली." लोण्याचा गोळा अस्वाद्य असतांना व तोंडांत विरघळला असतांना तो बाहेर थुंकून टाकला अशी सूचना प्रो. पंगु यांच्या अर्थावरून होते ती अर्थात्‌च ग्राह्य नाही. या श्लोकाचा मला अर्थ वाटतो तो असाः—"नैषधकथा ही आधींच नवनीतभेला म्हणजे नलराजाची कथा लोण्याच्या गोळ्याप्रमाणे सर्वांनाच मुळी अस्वाद्य वाटत होती; विशेषतः दमयंतीच्या जिभेला तर अधिकच चविष्ट वाटली. सूर्याच्या उदयामुळे लोणी विरघळतें त्याप्रमाणे हंसाच्या आगमनामुळे नलकथा विस्तारली म्हणजे नलकथेबद्दल अधिक बोलतां आलें आणि हंसाने नलासंबंधी जें जें सांगितलें त्याचा तिने स्वीकार करून

नंतर बोलण्यास सुरुवात केली." 'वचन आदरीते' हा वाक्यप्रयोग रघुनाथपंडिताने संस्कृतच्या धर्तीवर केला आहे. 'वचनं स्वीकरोति' किंवा 'वचने आदरं करोति' असा वाक्यप्रयोग संस्कृतमध्ये विश्रुतच आहे.

श्लोक १२३ आणि श्लोक १५० यांवरील टीकेंत प्रो. पंगु यांनी त्या त्या श्लोकांचे अपर अर्थ सुचविले आहेत. तसेच श्लोक १६५ वरील टीकेंत 'केसरी'ने सुचविलेल्या अर्थाला पाठिंबा देण्याशिवाय कांहीहि केलें नाही. तेव्हा त्यासंबंधीं लिहिण्याचें कांही कारण नाही.

श्लोक १५६ प्रो. पंगू लिहितात– "या श्लोकांतील 'वैजयंती' या शब्दाच्या अर्थाबद्दल प्रो. पारसनिसांची कींव करावीशी वाटते. "स्यात्प्रासादो वैजयंतः" एवढें देखील त्यांस समजले नाही हें आमचें दुर्दैव होय." यावरून वैजयंती या शब्दाचा प्रासाद हा अर्थ पंगूना मान्य आहे असें दिसतें. मूळ श्लोकांत वैजयंती शब्द आहे आणि पंगूंनी अमरकोशांतील जो श्लोकार्ध उद्धृत केला आहे त्यांत वैजयन्त असा शब्द आहे हें त्यांच्या ध्यानांत आलें नाही. वैजयन्ती याचा अर्थ पताका असा आहे. 'पताका वैजयन्ती स्यात्केतनं ध्वजमस्त्रियाम्' (अमर). तसेंच 'वैजयन्ती पताकायां जयन्तीपादपेस्त्रियाम्' (मेदिनी) यावरून स्पष्ट दिसतें; आणि तोच अर्थ ग्राह्य आहे.

साई या शब्दाचा अर्थ झाडी असा मी दिला आहे. त्याबद्दल प्रो. पंगु म्हणतात– "तो केवळ अनुमान धक्कयानेच दिलासा दिसतो. ग्रंथावर टीपा देतांना कोश पहावा लागतो" इत्यादि. नवनीताच्या शेवटीं शास्त्रीमंडळींच्या सहाय्याने परिश्रमपूर्वक तयार केलेला कठीण शब्दाचा जो कोश जोडला आहे तिकडे प्रो. पंगु यांचें आम्ही लक्ष वेधतों; म्हणजे ग्रंथावर टीपा देतांना एकच कोश पाहून चालत नाही याची जाणीव त्यांच्यामध्ये निर्माण होईल.

साई या शब्दाचा अर्थ सावली असाहि कोशांत दिला आहे आणि संस्कृत छाया या शब्दापासून त्याची व्युत्पत्ति दर्शविण्यांत येते. प्राकृतमधील किंवा संस्कृतमधील 'छ'चा मराठीमध्ये 'स' होतो, हें पुढील उदाहरणांवरून दिसून येईल.

| संस्कृत | प्राकृत | मराठी | संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| इक्षु | उच्छु | ऊंस | कुक्षि | कुच्छि | कूस |
| तक्ष् | तच्छ | तासणें | कच्छप | कच्छव | कांसव |
| वत्सरूपम् | वच्छरूअं | वासरूं | पिच्छ | पिच्छ | पीस |
| कक्ष | कच्छ | कास | | | |

परंतु या सर्व उदाहरणांमध्ये 'छ्' हा अन्त्य आहे, आद्य नाही. शब्दाच्या प्रारंभी असलेल्या 'छ'चा 'स' होतो किंवा कसें याबद्दल तज्ज्ञांनी विचार करावा म्हणजे छाया या शब्दापासून 'साई' शब्द झाला आहे असें निःशंकपणे प्रतिपादतां येईल.

प्रो. पंगु लिहितात 'पंचू=बहादर' असाहि अर्थ सुचविण्यास हरकत नव्हती. परंतु असा अर्थ सुचविण्यास आधार काय हें मात्र ते सांगत नाहीत. मोल्स्वर्थचा कोश आणि अगदी अलिकडे प्रसिद्ध झालेला भिडे यांचा सरस्वतिकोश यामध्ये हा शब्द दिलेला नाही. तसेंच निरनिराळ्या पुस्तकांना (ज्ञानेश्वरी, तुकारामाचे अभंग इत्यादि) जे शब्दकोश जोडलेले सापडतात, त्यामध्येहि हा अर्थ मला आढळून आला नाही. प्रसिद्ध कवि साधुदास यांनी मराठीची सजावट म्हणून जीं दोन पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांतील एका भागांत प्रस्तुत आख्यानांतील कांही श्लोक उद्धृत केले असून त्यांनी मात्र पंचू याचा 'फन्शी, बहादर' असा अर्थ दिला आहे. त्यासंबंधी त्यांच्याकडे पृच्छा केली असतांना त्यांनी मला असें कळविलें आहे की, मराठींत 'पंचीं' शब्द आहे. 'बरें आहे पंचीं, पाहून घेईन'. असा प्रयोग प्रचलित आहे. नलदमयंतीआख्यानांत आलेला पंचू शब्द आणि प्रचलित बोलींत येणारा पंची शब्द एकत्र समजून त्यांनी तो अर्थ दिला आहे. परंतु व्युत्पत्ती आणि इतरत्र उपयोग यांचा आधार जोपर्यंत सापडत नाही तोपर्यंत ही एक कल्पनाच राहणार आहे. अर्थात् इतका विवाद्य असणारा अर्थ दिला नाही म्हणून संपादकास विरोधी टीकाकाराखेरीज कोणी दोषी धरील असें वाटत नाही.

लेखनाच्या भरांत अधिक उणा शब्द गेला असल्यास प्रो. पंगु यांची क्षमा मागून हा लेख संपवितों.

श्री. रा. पारसनीस

प्रो. श्री. रा. पारसनीस यांजकडून ह्याच विषयावर लिहिलेला आणखी एक विस्तृत लेख आमच्याकडे प्रसिद्धीसाठी आला आहे; परंतु 'परीक्षणाचें परीक्षण' करणें हा म. सा. पत्रिकेच्या संपादकीय शिरस्ता नसल्यामुळे तो आम्हांस प्रसिद्ध करतां येत नाही याजबद्दल वाईट वाटतें.

—संपादक

# अभिप्राय

## १ महाजनांची कविता भाग १ ला. ( किं. १ रु. )
## २ कविसंमेलन भाग २ रा. (संपादक, दे. ल. महाजन, नांदेड, किं. १ रु.)

मोंगलाईतील महाराष्ट्रांत नांदेड येथे रा. देविदास लक्ष्मण महाजन यांच्या सक्रिय प्रोत्साहनाने शारदाश्रम जें भाषासेवेचें कार्य करीत आहे त्याचीं हीं दोन दृश्य फलें आहेत. ज्या प्रांतांत मराठी ही मायभाषा असून तिला राज्यकारभारांत कोणताहि मान नाही, इतकेंच नव्हे तर ती नष्ट व्हावी म्हणून नानाप्रकारचे उपाय योजण्यांत येत आहेत त्या प्रान्तांत स्वभाषा जिवंत ठेवण्याचे जे जे प्रयत्न होत आहेत त्यांची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे. प्रस्तुत दोन्ही पुस्तकांतील कविता सरळ, सुबोध, प्रौढ व प्रायःशुद्ध अशा भाषेंत रचिलेल्या असून त्या एकंदरीने पाहतां वाचनीय आहेत; रा. महाजन यांच्या ' अनन्यशरणागति ', ' सृष्टिकाव्य ', ' वर्षर्तूंतील उषःकाल ', ' तेजोभङ्ग ', ' पोपटाची परवशता ', ' मातृहृदय ', या आणि कविसंमेलनांतील ' वेणींतलीं फुलें ', ' उगाच कां अभिमान ', ' २ रा माझ्या सोबतीस ', ' नको भेटूं बोलूं ', ' रुपेरी मेघास ', ' डिंगळ ', ' गेलें उडुनी फुलपाखरूं ' या कवितांचा विशेष उल्लेख करावासा वाटतो. महाराष्ट्रांत इतरत्र निर्माण होत असलेल्या कवितांच्यापेक्षा यांचा दर्जा कोणत्याहि तऱ्हेने कमी नाही. भाषाशुद्धीकडे मात्र अधिक लक्ष्य पाहिजे. महाजन यांच्या कवितांतील कमलेक्षणेच्या ऐवजी ' कमलेक्षणि ', ' शीरीरं ', ' चित्स्वरुप ', ' वास्मिकि ' अथवा कविसंमेलनांतील ' प्रतीवा ', ' तरुवर ', ' कोवळीकता ' ( कोवळीक म्हणजेच कोमलता ), ' क्षुधीत ' ' लिला ', ' द्वितिय ' इत्यादि अशुद्धरूपें उद्विग्नता उत्पन्न करून रसहानि करितात. रा. महाजन यांनी लिहिलेले गजल जोरदार वठले आहेत. परन्तु ' नशीवाचा खेळ ' या गजलांत मात्र ११ ओळींपैकी ध्रुवपदाची एक ओळ, दुसऱ्या कडव्यांतील दोन्ही ओळी आणि ५ व्या कडव्यांतील शेवटली ओळ इतक्याच म्हणजे ११ ओळींपैकी ४ बरोबर आहेत. असें कां व्हावें तें कळत नाही.

" साहित्यांतहि अल्प डाळ न शिजे कोठे वशील्या विना " असें रा. महाजन म्हणतात. पण वशिल्याने कोठे कोणाला थोडी प्रसिद्धि मिळाली तरी ती टिकत नाही हें त्यांनी विसरूं नये. जें हृदयापासून निघेल तेंच हृदयांत रिघेल. त्याला शिफारसीची गरज नाही. अंतःकरणास जें पटेल, अंतःकरणापासून निघेल व दाबून दवडूं म्हटल्याने जें दबणार नाही तेंच कवींनी व्यक्त करावें, मग यशाची शङ्काच नको.

मा. त्रिं. पटवर्धन



अनुक्रमणिका

# पेशवाईच्या सावलींत*

(लेखक:— ना. गो. चापेकर)

(एका अप्रसिद्ध नाटक मंडळीची व त्यांतील कांहीं नटांची माहिती)

रघुनाथ हरी ऊर्फ तात्यासाहेब चिपळूणकर यांच्या प्रोत्साहनाने व आश्रयाने एक पौराणिक नाटकें करणारी मंडळी शके १७७७ च्या पूर्वी स्थापन झाली. कदाचित् ही मंडळी पुणेकर मंडळी म्हणून ओळखली जात असेल. चिपळूणकर यांच्या दप्तरीं जीं पत्रें संग्रहित आहेत त्यांवरून ही मंडळी लौकरच फाटाफूट होऊन मोडली असावी असें वाटतें.

बभ्रुवाहन, कूर्मावतार, सीताहरण, विराटपर्व, पारिजातक, रासक्रीडा, वालीवध, आंगदशिष्टाई, नरसिंहाख्यान, द्रौपदी स्वयंवर व सीतास्वयंवर इतके पौराणिक खेळ या मंडळींने केल्याचें पत्रव्यवहारावरून दिसतें. त्या वेळच्या इतर पौराणिक नाटकमंडळ्या अशाच प्रकारचे खेळ करीत असले तरी प्रत्येक मंडळीचे खेळ निरनिराळे असावेत असें आम्हांस वाटतें. त्यावेळेस नाटकें तयार करण्याचा एक मोठा कारखानाच महाराष्ट्रांत होता असा भास होतो. त्यावेळीं छापण्याची कला नव्हती व निरनिराळ्या मंडळींत वैमनस्य असे. त्यामुळे एकाने रचलेलें नाटक सर्व कंपन्या करीत असें मानणें चुकीचें होईल. प्रत्येक मंडळींत नाटक रचणारा कोणीतरी असेच. ह्या पुणेकर मंडळीला "चिपळूणकर मंडळी" असें सुखबोधार्थ नांव आपण देऊं. ह्या चिपळूणकर मंडळींत नारो रामचंद्र सोहोनी या नांवाचा एक हुशार माणूस होता, तोच नाटकें रची. "हल्ली उत्तररामचरिताच्या कविता चालल्या आहेत" "मी दहा बारा नाटकें तयार करून ठेवितों" "आपल्या आज्ञेप्रमाणे श्रियाळ आख्यान करावें तर मजजवळ ग्रंथ नाही, आपण पाठविलेल्या हॅन्डबिलावरून होणें अशक्य" "आमच्या कवितांची वही चोरीस गेली" "येथे रा. त्रिंबकपन्त व बाळकृष्ण सांगलीकर यांनीं आमची आख्याने चोरून नेली, त्याजमुळे बारसी मुक्कामी त्यास घालवून दिलें." "हल्ली आतां आमची सात नाटकें तयार आहेत व आणखी कांही जास्त करण्याची तजवीज चालविली आहे". अशा प्रकारची माहिती नाना सोहोनी याने पत्रद्वारें चिपळूणकर यांस दिली आहे. ह्यावरून या मंडळीची सर्व नाटकें सोहोन्याने बनविलीं असावींत असें वाटतें.

---

* या लेखांतील टीपा रा. शं. बा. मुजूमदार यांचे माहितीवरून दिल्या आहेत.

तात्यासाहेब चिपळूणकर यांना लिहिलेल्या एका पत्रांत त्याने केलेली एक आर्या आढळली, तिच्यावरून नानाची काव्यशक्ति कळून येईल. ती आर्या अशी:—

" मत्पासून शतशा जरी घडले अपराध चित्तिं नाणावे ।
विनयें प्रार्थित तुम्हां बालक तुमचाच चित्तिं आणावें ॥

नाना हा सांगलीजवळ गणेशवाडी येथील राहणारा होता. खानदेशचे असिस्टंट कलेक्टर ग्रँडसाहेब यांचा पंचवीस रुपयांवर खाजगी कारकून होता. बहुधा त्यांना हा मराठी शिकवीत असावा. याला बुद्धिबळें चांगली खेळतां येत होतीं. परंतु पुढे हा व्यसनाधीन झाल्यामुळे मंडळीला याला काढून टाकणें भाग पडलें. " नानासाहेब सोहनी[1] यांनी नासीक येथे जो प्रकार कटीशूलाचा केला तो पत्रीं लिहिता येत नाही." अशी तक्रार चिपळूणकर यांजकडे मंडळींतील लोकांनी केलेली आढळते.

या नाटक मंडळींतील मुख्य स्त्रीनट गोविंदा काळे हा असावा असें "त्याच्या अंगची चोळी करणें आहे तरी त्याला खण पाठवावा " या वाक्यावरून वाटतें. या मंडळींतील दुसरे नट ( १ ) बाळशास्त्री आडकर ( २ ) बापूजी बाजी खरे ( ३ ) वासूनाना ऊर्फ वासुदेव जनार्दन ताम्हनकर ( ४ ) बाळकृष्णपन्त ओक ( ५ ) कृष्णाजी हरी रहाळकर ( ६ ) सोनोपंत दाते ( ७ ) अण्णा सोहनी ( ८ ) विठू सोहोनी ( ९ ) मोरभट गोडबोले ( १० ) बाबाजी शिवराम अभ्यंकर व ( ११ ) वे. शा. सं. रा. रा. परशरामशास्त्री पाटणकर असे होते. लक्ष्मण गोपाळ दाते याचें दुसरें नांव सोनोपंत असावें. याशिवाय १ गणपतराव २ व्यंकाप्पा ३ केशवराव भोवळकर हेहि या मंडळींत समाविष्ट असल्याचा संशय येतो.[2] शास्त्री व भिक्षुक हेहि नाटकांत जाऊन सोंगें घेत ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. या मंडळींत प्रथम विनायक गोपाळ फाटक या नांवाचा मनुष्य सूत्रधार असावा. नंतर सांगलीकर मंडळींतील वासुदेव म्हणून कोणी एक मनुष्य हेंच काम करण्यास आला असावा असें खालील वाक्यावरून वाटतें. " सांगलीकरांपैकी वासुदेव येथे येऊन सूत्रधाराचें काम चालवितो. त्यास सर्व आख्याने येतात. आतां सोहोनीची मुळींच गरज नाही. "

या मंडळीचा दरमहा भोजनखर्च ७५।८० रुपये असे; नाटकाला शंभर रुपये मिळाले म्हणजे नाटक फार यशस्वी झालें अशी समजूत होती. रुपया, आठ आणे, चार आणे असे नाटकाचे दर असत. तिकिटें लावून नाटक होई व हीं तिकिटें छापलेलीं असत. एका नाटकाच्या तिकिटांचा हिशेब एका कागदावर आढळला तो येणेप्रमाणे :—

---

१ नाना सोहनी यांची माहिती अप्पासाहेब किर्लोस्कर यांच्या चरित्रांत पृष्ठ १७–१९ मध्ये आहे.

२ हे बुधवार वाड्यांतील शाळेंत हेड मास्तर होते. यांच्या हाताखालीं सोहनी मास्तर होते.

जमा

२१२ · एकंदर छापून आली
तिकिटें ५९८

| | | |
|---|---|---|
| ५० | १ रुपयाप्रमाणे | ५० |
| ५० | ·॥· प्रमाणे | १०० |
| ११२ | ·।· प्रमाणे | ४४८ |
| २१२ | | ५९८ |

वरील नाटक ता. १० मार्च १८५५ रोजीं झालें. नाटकाचें उत्पन्न किती होई हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

जमाखर्च गु. नाना सोहोनी फा· ध· ८ श. १७७६

नाटकांची जमा

३१९। रु.

| | |
|---|---|
| ९८ | पहिले नाटकाबद्दल |
| १०७८= | दुसरे नाटकाबद्दल |
| ११०८= | तिसरे नाटकाबद्दल |
| ४ | तिकिटें; उधारी |
| ३१९। | |

एका खर्चाच्या टिपणावरून माहिती मिळते ती.

| | |
|---|---|
| २० | मांडवाचे मक्त्याबद्दल |
| ३ | रावणाचे मुखवट्यास |
| ४॥ | खुर्च्यांबद्दल |
| ६॥। | छापणावळीबद्दल |

पुण्यास सांगलीकरांचे वाड्यांत नाटकाचे खेळ होत असत. तेथे लोकांना बसण्याकरितां नवीन 'वोटे' घातले त्याला २१ रु. ४॥। आणे खर्च आल्याचें नमूद आहे.

## सांगलीकरांवर मात करावी हा पुणेकरांचा उद्देश होता.

श्री

राजमान्य राजश्री नानासाहेब यांसीः—

विनंती विशेष. तुम्ही हणमंता याजबरोबर पत्र पाठविले ते पाहून लिहिला मजकूर कळला. हल्लीं येथे सांगलीकर नाटकवाले येऊन त्यांनी दोन नाटकें केली. एक सीताहरण व दुसरें उत्तररामचरित्र. येते शनिवारी रामाचा राजवियोग नाटक- करणार व पुढे सुमारें दहा नाटकें करावयाचा बेत आहे कारण की, त्यास येथें कोणी

स्पर्धी राहिला नाही व दुसऱ्या लोकांनी आमच्यापुढें नाटकें काय करावयाची आहेत असें त्यांचे म्हणणें. त्याप्रमाणे तुम्हाकडून जो गडी आला त्याने येथे वर्तमान सांगि· तलें की, तुमचे नाटकांतील मंडळींचा बेबनाव आहे व तंटेबखेडे होऊन नाटक मोडले असे ऐकल्यावरून तर आतां ते निरवैर होऊन लोकाजवळ पाहिजे तशा गप्पा मारतात व आमचेकडेही कार्याकारण येतात जातात. तुम्ही येथे थिएटरांत नाटक करून वाहवा मिळविली व बाहेरही बराच लौकिक होऊन तुमचे गुणाची चीज झाली. परंतु त्याचे अन्तःकरणांत जो मोठेपणा आहे की, आमच्यापुढे उभे राहून वाहवा मिळविण्याची मुष्कील. त्यास बाहेर कोठें तरी जाउन पैसाच मिळवावयाचा त्यापेक्षां पुण्यांत येऊन महिनाभर मुक्काम करून पांच चार नाटकें जी चांगलीं असतील ती करून त्याची खात्री झाली म्हणजे पुढे जशी मर्जी असेल तिकडे जाण्यास कांही हरकत नाही. तुम्ही नाटक तयार करण्याचे कारण केवळ पैसाच मिळविण्याचे होते असे नाही. फक्त इर्षेचे कारणाने वाहवा मिळावी व गुणाची चीज व्हावी व पृथ्वीचे पाठीवर त्यापेक्षां जाजती करणारे आहेत असे लोकांस वाटावे त्याप्रमाणे झाले. आतां इतके दिवस श्रम करून जितका गुण दाखविला तो येथें त्या समक्ष आल्यानें म्हणजे कमी होईल असें नाही. श्रीदत्तात्रय कसा तरी आश्रय देईलच व कित्येक मंडळींचे मत आपलेकडेही आहे. तुम्ही आमच्याजवळ इतके दिवस ज्याप्रमाणें वागणूक ठेविली त्याचे श्रेय घेऊन पुण्यांत विशेषपणा मिळवाल अशी आमची खातरजमा आहे. त्यास आम्हास जें कळलें तें तुम्हास लिहिलें आहे. यापुढे तुमची मर्जी. सारांश ज्याच्याशीं इर्षा करून तुम्ही नाटक केले ते म्हणजे तुमच्या गुणापेक्षां फारच उत्कृष्ट आहेत असें आमचे मत नाही. व जे आमचे नाटकांत आहे तें त्याच्यांत नाही असे आमचे अन्तःकरणांत पूर्ण वाटते. त्यास सर्वमंडळी एक दील होऊन रात्रीचा दिवस करून पुढील शनिवारचे आंत येथे येउन दाखल होऊन त्याचे नाटकाचे दिवशींच नाटकाची तयारी करावी व लिहिले याजवर तुमचा भरवसा असेल असे जाणून लिहिलें आहे.

श्री

राजमान्य राजश्री नाना सोहनी–बापू मोरभट व निळकंठ[1] कृष्णराव बळवंतराव व गणपतराव भट व अनंत व मार्तंड व भिकोबा व्यंकापा बावाजी शिवराम गोविंदा हुडेकर व गोविंदा काणे उभयतां रामभाऊ गणु करंदीकर व खेडकर व नेवासकर वगैरे मंडळीस कळावे की, जो बापूस मजकूर लिहिला आहे त्याप्रमाणे इकडे येण्याचे करावे. कारण तुमचे नाटक लावले पोट भरण्याकरिता नाही. सर्वमंडळीस घरची प्रपंचाची काळजी नाही. ज्या हेतुनें नाटक केले तो हेतु पूर्ण होण्याचा समय हल्ली आला आहे.

१ निळकंठशास्त्री घारपुरे मराठी शाळा नंबर ४ चे हेडमास्तर मोरोपंत घारपुरे यांचे बंधु-सदर मोरोपंत घारपुरे यांचे चि. हयात आहेत.

तरी या समयीं हजर होऊन केले कामाची चीज करून येथे वाहवा मिळवून नंतर जावे, असा आमचा इरादा आहे. तर जी जल्दी होईल ती करून फार लवकर इकडे यावे. श्रीदत्तात्रय कृपेनें मदत होणे ती होईल व निश्चय पार पाडणें त्याजकडेसच आहे. या उप्पर जर सर्वांनी पोटावरच नजर देऊन मुलुकात जाणेचे असेल तर करणें असेल तें करावे. जर तुम्ही न आला तर इतके दिवस जे काय तुमचे बोलणें होते ते अन्तःकरणांतीलच होते असें आम्हास वाटणार नाही. फक्त वरचेवरच होते. मजकूर विशेष लिहून कळवावा असा नाही. सर्वांस माहीत आहेच.

ह्या पत्रावरून नांव लौकिकाच्या ईर्षेने ही मंडळी स्थापन झाली होती असें दिसतें.

भालदाराची काठी, सोन्याचा वर्ख, टोप व गंगावने, ब्रह्मदेवाचा मुखवटा व मोतीं असे जिन्नस मुंबईपुण्याहून नाटकवाले मागवीत असत. "मोत्यांची जोडी जी पुण्यास एक रुपयास मिळते ती येथें (मुंबईस) तीन चार आण्यास मिळते." वगैरे.

नाटकवाल्यांना वर्तमानपत्रांचे वर्गणीदार होणें हें भूषण वाटूं लागलें होतें. "आजपासून पुण्यांतील ज्ञानप्रकाश पत्र घेण्याकरिता तिकडे लिहून पाठविलें आहे. आमच्या कृत्यास वर्तमान पत्रें हें भूषण आहे. यामुळे पत्रें घेण्यास प्रारंभ केला आहे.

नाना सोहोनी यांचें पत्र.
शके १७७७

चिपळूणकर हे या नाटकमंडळीचे उत्पादक होते असें मानण्यास बाबा आडकर याच्या पत्रांत आधार मिळतो. "जसी श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपासाहेब सांगलीकर यांनी गोष्ट आरंभून तो प्रकार सिद्धीस नेला, त्याप्रमाणेच आपली कीर्ति जगांत झाली."

या नाटकाला लोकाश्रय ठिकठिकाणीं चांगला मिळत होता हें खालील उताऱ्यांवरून दिसून येईल.

"नगर येथें आमचीं नाटकें रासा सुद्धां चार झाली. येथील मुन्सफ सदाशिवपंत भाऊ यांचा लोभही आम्हांवर फार आहे." "येथील (नगर) लोकांनी राहण्याचा फारच आग्रह केला. बडे लोकांकरिता घरगुती एक नाटक केलें. वांबूरीचे लोक येथें आम्हांस बोलाविण्यास आले आहेत याज करितां तेथें जाणार. येथील लोक आमच्या नादीं फारच लागले आहेत."

"दिपोटी, कलेक्टर, दादोबा पाण्डुरंग आणि प्रिन्सिपॉल सदर अमिन, सदाशिवपन्त गोडबोले वगैरे बडे बडे कामदार लोकांची मुलाखत झाली. या लोकांच्या मनांतून नाटक पहाण्याचा हेतू फारच आहे. आणि हे लोक आम्हास बहुत प्रकारें करून सहाय्य करतील हे खास." "श्रीदत्तात्रेय कृपेकरून चांगली वाहवा झाली. येथील (घोडनदी) लोकास नाटक चांगलें वाटून हे लोक आम्हास फारच वळले आहेत

येथील सहाय्यकारी मंडळी आम्हास मेजवानी करणार आहेत." "येथें सरकारनें (विंचूरकर) आमचा चांगला बंदोबस्त ठेवला आहे. विंचूरकर सरकारनी मला रास-क्रीडा नाटक सरकारांत केले त्या वेळेस एक पागोटें आणि चांगला दुपेटा आणि ४० रुपये दिले आणि बापूस पागोटें, व कृष्णास पागोटें, मोरभटास पागोटें आणि कांही रुपये दिले. शिवाय कांही मंडळीस रुपये वाटिले खेरीज नाटकाचा पैसा दिला. विंचूरकर यांनी एक पटेवाला दिला आहे. तो आमचेबरोबर येणार." "नाशकास हिंगण्यांच्या वाड्यांत खेळ झाला."

"नासीक मुक्कामीं बाबासाहेब हिंगणे यांचा आधार चांगला आहे. आम्ही त्यांच्याच वाड्यांत उतरलो आहो"

"पुणें सोडल्यापासून दोन हजार रुपये मिळाले"

"जळगांवीं नाटकाचे मक्तेच होत आहेत."

"येथील (अहमदनगर) कामदार दादोबा पांडुरंग व भाऊसाहेब मुनसब वगैरे लोकांची आम्हावर मोठी कृपा आहे. येथें इंदूर सरकारचा दिवाण बाबासाहेब पारनेरकर आले आहेत. त्यांणी आमचें नाटक पाहून फार संतोषीत झाले आणि आम्हास इंदूरास येण्याविषयी आश्वासन दिलें."

"येवले मुक्कामी तीन नाटके केली. मामलेदार गुरुरावजी कानडे याणी आमची बरदास्त चांगल्या प्रकारची ठेवून येथें खेळास जागा न मिळाल्याकारणानें त्यांणी आपल्या घरीं जागा नीट करून मांडव वगैरे घालून तयार केली. त्याला खर्च एकंदर २५।३० रुपये लागला असेल परंतु तो खर्च आमच्यावर अगदी पडला नसून आमची सर्वप्रकारें चांगली बरदास्त ठेवली आहे."

"आम्ही सोलापूरास येऊन आठ दहा दिवस झाले. येथे जागा लष्करांत थेटर करून खेळ चालू जाहले. सरकारची मदत येथे व लष्करांत चांगली आहे. खेळ एक मंदवारीं जाहला व आजचा खेळ आहे. येथे एका दिवसाआड खेळ होत आहे. मिळकत बरीच आहे."

"सीता-स्वयंवर तिकीटे लावून घोडनदीस केले. त्याची रीज येथील लोकांस बरीच पटली."

यावरून नाटकाची हौस लोकांत किती उत्पन्न झाली होती हें दिसून येईल. इतर नाटक कंपन्याचा उल्लेखही या पत्रांतून केलेला आढळतो.

"मुंबईकर नाटकवाले हे धुळें मुक्कामीं आलें होते. त्यांचे "सुलोचनाख्यान" नाटक पाहिलें. फारच वाईट होऊन त्यांचा फजिता झाला. सदर्हू नाटक फारच अभिमान करून येथे आलें होतें. पण त्याची थट्टा उत्कृष्ट झाली."

"सांगलीकर रामा अवतारी येथें (मुंबई) येऊन दोन खेळ थेटरमध्ये केलें (१) विराटपर्व (२) गोपीचंद" "नाटक झालें. तेथे मंडळी बहुत समाजही मिळाला होता. त्यापैकी कित्येक मंडळी इकडील (शेडाणीची) होती ती आली. त्यांणीं सांगि-

तले की, पूर्वी सांगलीकर यांचेही नाटक पाहिलें. व हेंही (वभ्रूवाहन) पाहिलें नाटक अप्रतीम झालें. असो, जी गोष्ट स्वीकारली तिची वाहवा झाली म्हणजे आनंदच आहे."

चिन्तोपन्त रोजेकर यांचे चिपळूणकर यांस पत्र—

" सांगलीकर बडोद्यासच आहेत. ते तेथून परभोर इंदूरास जाणार असे ऐकिवांत आहे."

"येथें दिक्षित यांनी वाईकर गोविंदभट गोखले वगैरे मंडळी आणवून नवीन नाटकाची तयारी चालविली आहे. त्यांत वेदमूर्ति रा. भिकंभट लेले यांचे चिरंजीव आले."

नाटक मंडळ्या स्थापन झाल्यामुळे नाटकांतील वागणुकीचे नियम बनत चालले होते. एखाद्या नटास कोणी बक्षिस दिलें तर त्याच्यावर सत्ता कोणाची यासंबंधीं जो निर्णय झाला तो खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

" तुम्हास अगर नाटकांतील दुसरें कोणास बक्षिस दिलें असेल तर तो पैसा तुमचा आहे असे आम्ही समजत नाही. कारण मुख्य नाटकास आरंभ करणार रा. विष्णुपन्त भावे येथे आले आणि त्याचें नाटकांतील वहिवाटी आहेत त्यांत असा नियम आहे की, नाटकांत कोणास जरी कांही मिळाले तरी तो पैसा सर्वांनी घ्यावा. तो कोणता म्हटला तरी जे केवळ त्यांत भिक्षुक असतील आणि श्राद्धास, भोजनास जरी कोठे गेले तत्रापि तो पैसा सर्वांचा आणि जे कोणी नाटकास बक्षिस देणार आहेत ते म्हणजे सर्वांस बक्षिस देतात असे नाही. त्याचपैकी त्याजवर कोणाची मर्जी असते त्यासच पैसा देतात त्याच नाटकांतील कोणी एक मनुष्य जरी असेल तरी चिन्ता नाही परन्तु जें नाटक जेथें जातें आणि घरें सोडून मंडळी बाहेर निघाली म्हणजे घरीं येई पावेतो जी काय मिळकत होईल तो जितके नाटकांतील हीसे (?) जात दरमहा खेरीज करून असतील ती त्यांची असें आह्मास सांगितलें."

चिपळूणकर यांचें नाटकवाल्यांस पत्र—

अशा रीतीने नाटकवाल्यांचे खेळ सुव्यवस्थितपणाने चालू होते. तथापि हा उत्कर्ष ज्यांना पाहवेना असे कांही लोक त्यांच्या मार्गांत विघ्न आणीत होते. रघुनाथ हरी नाना सोहन्यास लिहितो, "द्वेषी यार्णी तुमचा नाश करावा इतक्या विषयीं बहुत खटपट चालविली आहे. व जे तुमचा वाईट मजकूर छापविणार होते त्याणी त्यास आम्हास मिळोन तुमची दुंमत घ्यावी म्हणून तजवीज चालविली, परंतु आम्ही ती गोष्ट नाकबूल केल्यामुळे जास्ती द्वेष जाहला आहे. तुम्ही येथे नाही पाहून सांगलीकर मंडळीस आणविण्याची तजवीज करणारांनी केली आहे."

नटामधेही आपसांत भांडणें सुरु झालीं.

"रा. बलवंतराव अभ्यंकर यास नाटकाचे कारभारी म्हणोन गर्व येऊन माझा कंटाळा करितात. असो. निभावलें तोंपर्यन्त राहीन." असें नगराहून कृष्णा रहाळकर चिपळूणकरांस कळवितो. नाना सोहन्याला काढून टाकावा लागला व त्याच्या ठिकाणी

# अभिप्राय

**पाश्चात्य पुरुषश्रेष्ठः**—(लेखक व प्रकाशक श्री. श्री.म. माटे; १९६।७६, सदाशिव पेठ, पुणें नं. २ किंमत १ रुपया) ह्या २०६ पानांच्या पुस्तकांत शिकंदर, हॅनिबल, सीझर, ख्रिस्त, लूथर, कोलंबस, क्राम्वेल, सोबेस्की व पीटर दि ग्रेट या नऊ पाश्चात्य पुरुषश्रेष्ठांचीं जीवनचरित्रें देण्यांत आलेलीं आहेत. जागतिक संस्कृतीचे घटक म्हणून हे नऊ पुरुषश्रेष्ठ (कीं पुरुषोत्तम ?) निःसंशय आजच्या लोकांच्या परिचयाचे झाले पाहिजेत. शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांना यांपैकी बऱ्याच जणांची ओळख होतेच; तथापि इतर माणसांनाहि (adults) जगांतील सर्व थोर व्यक्तींची सामान्य माहिती होणें आजच्या सार्वराष्ट्रीय जीवनाच्या काळांत अत्यवश्य आहे. तेव्हा श्री. माटे यांचें हें पुस्तक महाराष्ट्र समाजाच्या बौद्धिक संस्कृतीला पोषकच होईल. त्यांनी यांखेरीज जगांतील इतर अनेक जे पुरुषश्रेष्ठ आहेत त्यांचाहि 'पुरुषश्रेष्ठ-मालिकें'त क्रमशः समावेश करावा.

आता पुस्तकाच्या अंतरंगाकडे वळूं. एखाद्या थोर पुरुषाचें चरित्र लिहावयाचें म्हणजे अनेक कार्यक्षेत्रांत त्याने केलेले पराक्रम वर्णावयाचे अशी पद्धत आहे. पण असें करूं जातां पसारा वाढतो व पुस्तक सामान्य वाचकांना सुबोध आणि चित्ताकर्षक होत नाहीं. तेव्हा प्रत्येक चरित्रांतील फक्त खाजगी भाग निवडून तो मनोरंजक होईल असा मांडावयाचा हाच योग्य क्रम आहे व त्याचा श्री. माटे यांनी मोठ्या कुशलतेने अंगिकार केला आहे. खाजगी भागापैकी चरित्रकाराने कोणता निवडावा व तो उठावदार करावा याबद्दल वाचकांमध्ये मतभेद राहीलच; तथापि जो भाग राष्ट्रीय गुणांचा पोषक असेल व ज्यांमुळे चरित्रनायकाची प्रसिद्धी झाली तोच गुणगर्भित भाग विशेष विस्तारावा लागेल. याहि गोष्टीकडे श्री. माटे यांनी कांही लक्ष पोंचविलेलें दिसून येतें. श्री. माटे यांची भाषासरणी मात्र रूढीमार्गाहून अगदीच निराळी आहे. ती कोणाला अगदी अनागरी म्हणून आवडेल तर दुसऱ्या कोणाला प्रस्तुत सुसंस्कृत भाषेच्या अमदानींत अगदी अननुकरणीय किंबहुना गर्हणीय वाटेल. आज जुने आणि खेडवळ वाक्प्रचार –प्रयोग पुन्हा रूढ करावे कीं नाही हा प्रश्न वादाला निघूं पहातो व त्याचा एकदम निर्णय लागणें अशक्य आहे. तेव्हा श्री. माटे यांचे 'शिपायांचें पेंव पोलंडवर फुटलें', 'समुद्रास गरगरून भरतें आलें', 'इ. स. १४८६ च्या वसंतांत कोलंबस राजधानीस आला', 'अगदी कदरून गेल्यामुळे', 'ऐदी प्रतिष्ठितांचा लोंढाळा', 'मगरमिठी झिंजाडून', वगैरे शब्द आणि वाक्यें यासंबंधी योजलेले प्रयोग चांगले कीं वाईट ठरविणें हें वाचकांच्या आवडीनिवडीवरूनच ठरणार. असो. एकंदरींत या तऱ्हेचीं पुस्तकें मराठी भाषेत निघून भाषेला नवें तेज चढत आहे ही गोष्ट कोणाहि भाषाभिमान्याला आनंददायकच वाटेल.

चिंतामण गणेश कर्वे

**लोकशिक्षण**—या मासिकाचा ताजा अंक नुकताच हातीं आला. मासिकाचे संपादक रा. जांभेकर यांनी सदर मासिक आजमित्तीपर्यंत उत्कृष्ट प्रकारें चालविलें आहे. कै. नाना ओक यांच्या वेळीं या मासिकाचा जो दर्जा होता, तोच दर्जा, रा. जांभेकर यांनी स्वतःस तोशीस

लावून कायम राखिला, याबद्दल कौतुक वाटतें. तथापि, या कौतुकाबरोबर, रा. जांभेकर यांनी स्वतःस कितपत तोशीस लावून घ्यावी, याचा विचार महाराष्ट्रानें आपलेपणाच्या भावनेनें करण्याची वेळ सांप्रत आली आहे, असेंहि आम्हांस वाटतें. चटोर व हीन दर्ज्यांच्या मराठी वाङ्मयास उत्तेजन देण्यापेक्षा मराठी भाषेंतील निरनिराळ्या शाखांतील विद्वानांनी आपल्या लेखांनी अलंकृत केलेल्या या मासिकाला जर महाराष्ट्रानें उचलून धरिलें, तर मराठी वाङ्मयांत चांगली भर पडेल व सांप्रतप्रमाणें संपादकांना मासिकाची अडचणीची स्थिति प्रसिद्ध करण्याची वेळ येणार नाही. निदान या अंकांत संपादकांनी जी एक ग्रंथावलीची योजना मांडिली आहे तिला तरी भरपूर आश्रय मिळणें जरूर आहे. या आमच्या सूचनेचा महाराष्ट्राकडून अव्हेर होणार नाही अशी आम्हांस पूर्ण आशा आहे. या मासिकांत कोणकोणत्या विद्वानांचे लेख येतात त्यांची (चालू वर्षांतील) नांवें या अंकांत संपादकांनी दिली आहेत; त्यांवरून व सदर लेखकांच्या नांवांवरूनहि लोकशिक्षणाच्या कार्याची ठोकळ रूपरेखा वाचकांच्या लक्ष्यांत येईल. या अंकांत नेहमींप्रमाणे ऐतिहासिक, काव्यात्मक, राजकीय वगैरे विषयांवरील लेख आले आहेत; त्यावरून व आजपर्यंच्या या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या एकंदर लिखाणांवरून सदर मासिकानें महाराष्ट्रांतील नियतकालिकांत श्रेष्ठ प्रतीचें स्थान मिळविलें आहे या बद्दल कोणांस शंका राहणार नाही! उत्तेजनार्थ आश्रय देणें अवश्य तर आहेच, पण शिवाय उत्कृष्ट मासिकाचा ग्राहक होण्यांत खऱ्या विद्वानास भूषणच वाटलें पाहिजे. तथापि सुशिक्षित व विद्वान म्हणून मानल्या जाणाऱ्या गृहस्थांचीं "नको" चीं पत्रें वाचलीं म्हणजे मात्र कांहीं वेळ मन भावी स्थितीविषयी उद्विग्न झाल्या शिवाय रहात नाही. श्री. जांभेकरांची नवीन योजना यशस्वी होवो असें आम्ही इच्छितों.

ना. गो. चापेकर

**रणदिवे यांची कविता भाग १ ला:—** (प्रकाशक– प्रभाकर दत्तात्रय रणदिवे, कागल किं. १२ आणे) जैनांच्या पौराणिक कथांतील विविध काव्यमय प्रसङ्गांना अनुलक्षून असलेली रणदिव्यांची सारी कविता या भागांत प्रसिद्ध केलेली आहे. धर्माच्या आपुलकीमुळे मराठी जैनांसहि वाचनीय वाटेल यांत शङ्काच नाही, पण मराठी भाषा ही महाराष्ट्रांतील अमूक एका धर्माची अथवा जातीची मिरास नसून ती अवघ्या मराठ्यांची आहे. रणदिवे यांची जैनविषयक कविता तिच्यांतील भावनातरङ्ग, शब्दलालित्य व ओघ इत्यादि गुणांमुळे सर्व मराठी जैनेतरांसहि वाचनीय अशी झाली आहे. त्यांनी मराठी भाषेची चांगलीच सेवा बजाविली आहे. 'प्रभावना' ही कविता विशेष संस्मरणीय वाटतें. रणदिवे यांनी संग्रहित करून ठेविलेल्या दुसऱ्या भागाचें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा सुयोग मराठी वाचक— जैन व जनैतर— लौकरच आणतील अशी आशा आहे.

माधवराव पटवर्धन

**पृ. ३०१ व ३०२ हीं पानें वाचतांना खालील दुरुस्त्या अवश्य कराव्या.**

पृ. ३०१ ओ. २७ 'स्टेशन आहे' या पुढे 'डॉ. बार्नेट यांनी आपलें मत' हे शब्द वाचावे.

पृ. ३०२ ओ. ४ व ६ 'रट्टनुरु' ऐवजीं 'रट्टनूरु'

पृ. ,, ,, ७ 'रट्टांचें' ऐवजीं 'रट्टाचें'

पृ. ,, ,, १६ '॥' पुढे 'असा उल्लेख आहे.' हे शब्द वाचावे.

| नांव | सन | रु. |
|---|---|---|
| वासुदेव लक्ष्मण चिपळूणकर | १९३० | ३-८ |
| प्रो. सदाशिव विनायक देशपांडे | ,, | ,, |
| केशव दाजी पुराणिक | १९३१ | ,, |
| गो. कृ. मोडक | ,, | ,, |
| गंगाधर विश्वनाथ गोखले | ,, | ,, |
| विश्वनाथ गणेश जावडेकर | ,, | ,, |
| महादेव हरी मोडक | ,, | ,, |
| सेक्रे. व्हिक्टोरिया ज. लायब्ररी धार | १९३१ | ४-८ |
| गोपाळराव बोरगांवकर | ,, | ३-८ |
| डॉ. भा. चिं. लेले | ,, | ,, |
| यशवंत लक्ष्मण गुप्ते | ,, | ,, |
| बी. एम्. पंडित | ,, | ,, |
| विनायक गोविंद रानडे | ,, | ,, |
| गणेश लक्ष्मण गपचूप | ,, | ,, |
| वासुदेव सदाशिव पाटणकर | ,, | ,, |
| अमृत कृष्णराव गांडेकर | ,, | ,, |
| रा. सा. गोविंद बळवंत रानडे | ,, | ,, |

| नांव | सन | रु. |
|---|---|---|
| श्रीपाद दामोदर सातवळेकर | १९३१ | ३-८ |
| सखाराम वामन जोशी | ,, | ,, |
| गणेश विनायक आठवले | ,, | ,, |
| नारायण वासुदेव गोरे | ,, | ,, |
| वि. पां. वर्वे | ,, | ,, |
| केशव नारायण काळे | ,, | ,, |
| रा. ब. सदाशिव भास्कर लिमये | ,, | ३-८ |
| बळवंत हणमंत पळशीकर | ,, | ,, |
| वासुदेव नारायण फडणीस | ,, | ,, |
| सेक्रे. जनरल लायब्ररी सांगली | ,, | ४-८ |
| ,, डी. एस्. गरूड लायब्ररी धुळें | ,, | ,, |
| विष्णु हरी निजसुरे | ,, | ३-८ |
| माधव प्रभाकर ओक | ,, | ,, |
| बळवंत गणेश खापर्डे | ,, | ,, |
| गोपाळ बाळकृष्ण चितळे | ,, | ,, |
| रावसो र. लु. जोशी (पुढील सालाबद्दल १॥ रु. मिळून) | १९३१ | ५-० |
| सी. न. जोशी | १९३१ व ३२ | ७-० |

अनुक्रमणिका

## देणगी

गोमंतकांत भरलेल्या १५ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या स्वागत मंडळानें म. सा. परिषदेस देणगी दाखल दिले. रु. १००

रावसो ना. गो. चापेकर व प्रो. मा. त्रिं. पटवर्धन हे हैद्राबाद येथें प्रचाराचें कायास गेले असतां त्यावेळीं दोन स्त्रियांकडून देणगी दाखल रु. ८८८

## वर्गणी

प्रो. नारायण केशव बेहेरे रु. ५०८४
प्रो. देवीदास दत्तात्रय वाडेकर रु. ५०
डॉ. बाळकृष्ण बळवंत राशिंगकर रु. ५०
केशव महादेव सोनाळकर रु. १०
कोंडो महादेव कुमठेकर रु. ५०
नारायण गोविंद चापेकर रु. ५०
श्रीमंत राजा धुंडिराज बहादूर रु. २५०
नामदार केशवराव कोरटकर रु. ८५
पांडुरंग महादेव बाक्रे रु. २०
(पूर्वी ३० रु. आले आहेत)

| नांव | सन | रु. |
|---|---|---|
| व्ही. एल्. गटणे | १९२८ ते ३० | १०८८ |
| गो. रा. देव | १९२९ | ३८८ |
| र. पां. करंदीकर | १९२९ ते ३० | ७ |
| ए. रा. आलेगांवकर | ,, | ७ |
| कृ. वा. जायदे | १९२९ ते ३१ | १० |
| प्रो. मा. त्रिं. पटवर्धन | १९३० ते ३२ | ९ |
| ,, रा. गो. भडकमकर | १९३० व ३१ पैकीं | ५ |
| मे. विद्याधिकारी संस्थान औंध | ,, | ९ |
| गोविंद सदाशिव आपटे | ,, | ७ |
| वि. ल. फडके | १९३१ व ३२ | ७ |
| कृ. ना. पंडितराव | १९३२ | ३८८ |
| रा. ब. रामचंद्र विष्णु महाजनी | १९३० व ३१ | ७ |
| गोपाळ कृष्ण देवधर | ,, | ,, |
| नारायण केशव भागवत | ,, | ,, |
| सुंदरराव भास्कर वैद्य | ,, | ,, |
| जी. एम्. फाटक | ,, | ,, |
| बाळ गंगाधर खेर | ,, | ,, |
| गंगाधर रघुनाथ भडभडे | ,, | ,, |
| श्रीमंत सरदार चंद्रोजीराव संभाजीराव आंग्रे | १९३०–३१ | ७ |

| नांव | सन | रु. |
|---|---|---|
| दत्तात्रय कृष्ण फडके | १९३० व ३१ | ७ |
| गणेश राजाराम परांजपे | ,, | ,, |
| सीताराम महादेव अभ्यंकर | ,, | ,, |
| भास्कर रामकृष्ण दामले | ,, | ,, |
| महादेव विनायक हेगडे | ,, | ,, |
| दत्तात्रय व्यंकटेश पै | ,, | ,, |
| पु. के. भाईसाहेब कोतवाल | ,, | ,, |
| शंकर वासुदेव किर्लोस्कर | ,, | ,, |
| सेक्रे. मराठी ग्रंथ-संग्रहालय ठाणें | | ९ |
| सेक्रे. कर्नाटक महाराष्ट्र-मंडळ धारवाड | १९३० व ३१ | ,, |
| आत्माराम हणमंत बोरवणकर | १९३० | ३–८ |
| रामचंद्र वासुदेव सोमण | ,, | ,, |
| शिवराम काशीनाथ ओक | ,, | ,, |
| महादेव गोविंद भालेराव | ,, | ,, |
| अच्युत सदाशिव देशपांडे | ,, | ,, |
| महादेव लक्ष्मण खांबेटे | ,, | ,, |
| मारुती अनंत पै | ,, | ,, |
| गणेश वासुदेव जोगळेकर | ,, | ,, |
| नारायण महादेव बाकरे | ,, | ,, |
| पुरुषोत्तम धोंडदेव पुरोहित | | ,, |

अनुक्रमणिका

